सरनोबत प्रकाशन, पुणें २

# संधि

नामवंत व नवोदित कवींच्या

अप्रकाशित

## कवितांचा प्रातिनिधिक कविता-संग्रह

---

प्रस्तावना लेखक

प्रा. रा. श्री. जोग, एम्.ए.

संपादक

वसंत रामचंद्र सरनोबत

सहसंपादक

भालचंद्र खांडेकर

साहाय्यक

व. दि. कुलकर्णी

---

नोव्हेंबर १९५०

( नवोदित कवींच्या चढाओढीसाठीं )

## परीक्षक

प्रा. रा. श्री. जोग, एम्.ए.
डॉ. वा. भा. पाठक, एम्.ए., पीएच्.डी.

## नवोदित कवींच्या बक्षिसें मिळालेल्या कविता

| क्रम | कवीचें नांव | कविता | रक्कम रु. | पृष्ठ |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. शंकर वि. वैद्य | ‘ स्वर्गाच्या सीमेवर ’ | २५ | १११ |
| २ | कु. सुधा पटवर्धन | ‘ होतों लहान आपण ’ | १५ | ११३ |
| ३ | श्री. प्रभाकर भ. बिडवे | ‘ दुर्बलांनो ! ’ | १० | ११४ |

# असें वाचावें

| पृष्ठ | ओळ | ऐवजीं | वाचावें. |
| --- | --- | --- | --- |
| १९ | शीर्षक | ‘ दलिताचा ’ | ‘ दलितांचा |
| २३ | वरून ३ | ‘ घिरट्या ’ | ‘ घिरट्या ’ |
| २८ | शीर्षक | ‘ आणी ’ | ‘ आणि ’ |
| ४० | शीर्षक | ‘ रागोळी ’ | ‘ रांगोळी ’ |
| ४१ | खालून ४ | ‘ निज , | ‘ तिज ’ |
| ७३ | वरून ८ | ‘ आकाक्षांची ’ | ‘ आकांक्षांचीं ’ |
| १०१ | शीर्षक | ‘ माझ ’ | ‘ माझें ’ |
| १०६ | दुसरी कविता शीर्षक | ‘ पहिलीकविता ’ | ‘ पहिली कविता |

---

टीप :—या संग्रहासाठीं केवळ अप्रकाशित अशांच कविता मागविलेल्या होत्या. जर एकादी कविता अन्यत्र प्रसिद्ध झाल्याचें वाचकांना आढळून आलें असेल तर ती कवीनें नजर चुकीनें आमच्याकडे पाठविल्यामुळें प्रसिद्धिली गेली आहे असें समजावें.

—सम्पादक.

# 'संधि' समर्पी—

'**संधि**' हा कवितासंग्रह दिवाळीच्या आनंदमय वातावरणांत वाचकांच्या हातीं देतांना विशेष आनंद होत आहे. '**मराठी कविता**' (१९२०–१९५०) हा कविता संग्रह प्रसिद्ध झाल्यानंतर नागपूर येथील पूजा प्रकाशननें '**प्रारंभ**' हा केवळ उदयोन्मुख कवींच्या कवितांचा संग्रह प्रसिद्ध केल्याचेंहि वाचकांच्या पाहण्यांत असेलच. हे दोन्ही संग्रह प्रकाशांत येऊन अर्ध-वर्ष उलटलें नाहीं तोंच '**संधि**' हा संग्रह प्रसिद्ध होत आहे.

यांत बहुतेक सर्व विद्यमान महाराष्ट्र कवींच्या कवितांना स्थान देण्यांत आलें आहे. जवळचे किंवा दूरचे, लहान किंवा मोठे, प्रसिद्ध किंवा अप्रसिद्ध अशी भावना ठेवलेली नाहीं. महाराष्ट्राच्या सर्व भागांतून व गोमंतक, मराठवाडा, कर्नाटक, वऱ्हाड या प्रांतांतून कवींनीं आपल्या कविता पाठवून या संग्रहास संयुक्तमहाराष्ट्रांतील कवितांचें प्रातिनिधिक स्वरूप आणण्यास साहाय्य केलें आहे. इंदूर, देवास, बडोदा, अहमदाबाद या दूरच्या ठिकाणच्याहि कविता लाभल्या आहेत.

तसेंच या संग्रहांत राजकवींच्या शेजारीं कुमार-कवि तर जुन्या पठडींतील कवींच्या शेजारीं खास आजच्या रक्ताचे अत्याधुनिक कवि खेळीमेळीनें वावरतांना दिसतील. लौकिकापासून ते अलौकिकापर्यंतच्या व निसर्ग-शक्तीपासून ते यंत्रशक्तीपर्यंतच्या विविध विषयांवरील कवितांचा समावेश येथें करण्यांत आला आहे. रचनेंतहि जुनें-नवें तंत्र आढळून येईल. हातीं आलेल्या कवितांतून निवड करतांना वरील सर्व गोष्टींकडे जास्तीत जास्त लक्ष पुरविण्यांत आलें आहे.

नवोदित कवींना या संग्रहांत अधिक अवकाश मिळावा ही मनीषाहि सफल झाली आहे. नवोदितांबरोबर आपल्या कविता प्रकाशित करण्याची जी संधि नामवंत कवींनीं उदार अंतःकरणानें दिली याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहों. कांहीं प्रथितयश व अव्वल दर्जाचे कवि यांच्या कविता प्रयत्न करूनहि मिळूं शकल्या नाहींत हें येथें नमूद करणें आवश्यक वाटतें.

केवळ अप्रकाशित कविताच येथें संग्रहित केल्या आहेत. कोणताहि कालखंड मुद्दाम म्हणून निवडलेला नाहीं. महाराष्ट्राच्या काव्यक्षितिजाचें आजचें दर्शन या काव्यसंग्रहानें झाल्यास आमचें कार्य सुफलित होईल.

नवोदित कवींच्यासाठीं बक्षिसाची योजना जाहीर केली होती, प्रा. रा. श्री. जोग व डॉ. वा. भा. पाठक यांनीं परीक्षकांचें काम करून निर्णय दिला त्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों.

प्रा. रा. श्री. जोग यांनीं आपल्या अनेकविध कामाच्या व्यापांतून सवड काढून मोठ्या आनंदानें विस्तृत व मार्मिक प्रस्तावना लिहून दिली ह्याबद्दल त्यांचे आभार कोणत्या शब्दानें मानावेत हेंच समजत नाहीं. राजकवि यशवंत यांनीहि मोठ्या ममत्व भावनेनें वेळोवेळीं मार्गदर्शन केलें ह्याबद्दल त्यांचे आम्ही कायमचे ऋणी आहों.

सदर संग्रहास ' संधि ' हें नांव सुचविल्याबद्दल महाराष्ट्राचे सुप्रसिद्ध भावगीतगायक श्री. गजानन जीवन वाटवे यांचे आभार मानणें कर्तव्य आहे.

' संधि ' प्रकाशांत आणण्याचें सर्व श्रेय जवळ जवळ श्री. भालचंद्र खांडेकर व श्री. व. दि. कुलकर्णी यांनाच आहे त्याचप्रमाणें कोल्हापूरचे कवि सूर्यकान्त खांडेकर यांनीहि जें सहकार्य केलें त्याबद्दल आम्ही ह्या सर्वांचे ऋणी आहों.

चिटणीस, म. सा. परिषद्, पुणें, 'सत्यकथा', ' अभिरुचि ', 'वसंत', या मासिकांचे संपादक यांनीं अनेक कवींचे पत्ते पुरविल्याबद्दल त्यांचे, तसेच चित्रकार श्री. मुळगुंद यांचे आणि अल्पावधींत संग्रहाचें छपाईचें काम वेळेवर पूर्ण करून दिल्याबद्दल समर्थ भारत छापखान्याचे चालक श्री, स. रा. सरदेसाई यांचे मनःपूर्वक आभार मानतों.

आपला

व. रा. सरनोबत

# आजचें मराठी काव्य

एका तपापूर्वी मराठी कवितेला ओहोटी लागल्याची शंका कोणा सूक्ष्मदृष्टि टीकाकारास आली असली, तरी आज त्या शंकेचें समूळ निरसन व्हावयास हरकत नाही. त्यानंतरच्या कालांत अनेक नवीं नांवें डोळ्यापुढे आलीं असून काव्यनिष्पत्तीहि खूपच होऊं लागली आहे. एवढेंच नव्हे, तर काव्यामध्ये कांही निराळें वारें वाहूं लागल्याचें सांगण्यांत येऊं लागलें असून केशवसुतांचें युग संपलें असल्याचेंहि जाहीर करण्यापर्यंत कांहींची मजल गेली आहे. आजच्या काव्यांतील एका प्रवाहास नवकविता असें संबोधण्यांत येत असून, ज्यास आजवर 'अर्वाचीन कविता' असें म्हणण्यांत येई, त्यापेक्षा हें काव्य निराळें असल्याचेंहि बोलण्यांत येत आहे. मराठी काव्याच्या इतिहासांत आजचा काल हा संधिकालाप्रमाणे असल्याची जाणीव काव्याच्या आस्थेवाईक वाचकास आजच होऊं लागलेली दिसते. प्रस्तुत काव्याचा संग्रहहि याच जाणीवेमधून निर्माण झालेला असावा, आणि या दृष्टीने तो प्रातिनिधिक झालेलाहि दिसेल. आजच्या मराठी कवींमधील कालाच्या दृष्टीने पडणारे सारे थर या संग्रहांत दिसतात. प्रथमतः यशवंत, मायदेव, शुक्ल इत्यादि कवि, त्यांच्यानंतरच्या पिढीमधील काळेले, गोपीनाथ तळवलकर, संजीवनी मराठे, वा. भा. पाठक, ढोकळ, पं. सप्रे, भवानीशंकर पंडित, कान्त, वसन्त वैद्य, झोकरकर हे कवि; त्यानंतरच्या कालांतील वि. म. कुलकर्णी, शान्ता शेळके, पद्मा गोळे, निकुम्ब, वसंत चिंधडे, ना. ग. जोशी हे कवि; यांच्या पाठोपाठ क्षितिजा-वर आलेले शरच्चंद्र मुक्तिबोध, विंदा करंदीकर, य. द. भावे, ग्रामोपाध्ये,

अनंत आठल्ये, अनंत पोतदार, शंकर रामाणी, ग. दि. माडगूळकर, गणेश कुडे, पुरुषोत्तम पाटील, मंगेश पाडगांवकर इत्यादि कवि, व अखेरीस जवळजवळ आजच काव्यप्रान्तांत पदार्पण करणारे अनेक कवि या संग्रहांत वाचकांस कवितेच्या रूपाने दर्शन देत आहेत. या सर्वांचें काव्य म्हणजे आजची मराठी कविता आहे. 'आजकाल अनेक मासिकांतून आलेल्या कविता वाचून जो कांहीएक संमिश्र असा परिणाम वाचकांच्या मनावर होतो, त्याचाच प्रत्यय जणू कांही या संग्रहाच्या वाचनाने यावा म्हणून या संग्रहांतील कवितांची मांडणीहि अगदी संकीर्ण अशी झाली आहे. तीमध्ये आताच निर्देशिलेला कालक्रम लावण्याचा किंवा एखादें विषयवार वर्गीकरण करण्याचा प्रयत्नहि मुळींच दिसत नाही. अशा या संग्रहामुळे मनांत येणारे विचारहि तसेच संकीर्ण वा विकीर्ण असे आहेत. पण असे हे विचारहि मी प्रकट करावे अशी संपादकांची इच्छा असल्याने तसा प्रयत्न मी येथे करणार आहें.

'संस्कृतीच्या वाढीबरोबर काव्याला ओहोटी लागते' असें जें विधान शंभर वर्षांपूर्वी मेकॉलेने करून ठेवलें होतें, तें त्यावेळीहि अनेकांस रुचलें आणि पटलेंहि नव्हतें. मराठी कवितेस आज आलेला बहर पाहिला की काव्याची भरतीओहोटी आणि संस्कृतीची ओहोटीभरती यांचा कांही संबंध आपल्यास लावतां येईल असें वाटत नाही. मात्र आजच्या मानवी संस्कृतीमध्ये विज्ञानाने ऐहिक सुखसोई आणि ऐश्वर्य कितीहि निर्माण केलें असलें, तरी त्या संस्कृतीमधून मानवता कमी झाली आहे अशा तऱ्हेची भावना आजच्या अनेक कवींमध्ये प्रबल झालेली असून तिने त्यांच्या कवितेस स्फूर्ति दिलेली दिसते. वैयक्तिक जीवनांतच नव्हे, तर एकंदर सामाजिक जीवनांत विफलता आणि विषमता भरून राहिली आहे, आजचें जीवन फार यांत्रिक झालें असून अनेक मानव त्यांत भरडून निघत आहेत, याबद्दल कविमनांत चीड उत्पन्न झाली आहे व ती आपल्या कवितेमध्ये ते

कवि प्रकट करीत आहेत. जीवन हें जीवन नसून त्याचें विडंबन आहे, मानव हाच मानवी रक्त शोषीत आहे, 'माणुसकीला मुकला मानव' अशी आज स्थिति आहे असें कोणी कवि सांगत आहे (पृ. १२६), तर 'प्रगती ही काय असे, मानव जी करि दानव' असा प्रश्न दुसरा करीत आहे (पृ. १२३). 'लाख चक्रांच्या गराड्यामधून तुमचें जीवन गिरक्या घेत आहे असें कोणी सांगत आहे (पृ. ११४), तर 'उरीं फुटे तों राबराबतों। मोतीं पिकवुनि माती खातों' असें आपलें जगणें असल्याचें कोणी तळमळून बोलत आहे (पृ. १०१). 'दोन घास मिळवाया। नमवावा लागे माथा॥ घास हातीं येतां येतां। शीर्षी बसतात लाथा' असा आपला अनुभव कोणी सांगतो (पृ. ९७), तर 'अस्मानाच्या अवकृपेशीं। सुलतानांची चाले स्पर्धा' असें या परिस्थितीचें कारण कोणी देत आहे (पृ. ९४). एका कवीने हें सारें पाप विज्ञानाच्या माथीं मारिलें आहे. 'कमाल पण या विज्ञानाची। सुधारणेच्या लागुनि नादीं। भस्मासुर तो उदया आला। आणिक मानव गुलाम झाला' अशी त्याची मीमांसा आहे (पृ. ६४). 'नाहीं हासत आजचीं बाळें, नाहीं हासत तयांचे डोळे, आजचें असें हें भयाण सत्य' कोणास दिसत आहे (पृ. २४-२५), तर 'वास्तवाच्या क्ष-किरणांत दिसतें जीवन उलटें उलटें' असें त्याच स्थितीचें वर्णन कोणी करीत आहे (पृ. १४). बहुतेकांनी हें सर्व सरळपणें सांगितलें असलें तरी कित्येकांनी तें रूपकाच्या द्वारें व्यक्त करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. सामान्य मानव हा गाढव असून त्याला शोषणारे मक्तेदार हे गाढवहाके आहेत व 'गाढव-हाक्या पायाने ढोसतो, आणिक धरतो, गाढवाच्या पुढे, काठीला बांधिली गवताची जुडी, धावतो गाढव, धावतो सदाचा खावया गवत,' असें हें त्याचें जीवन आहे (पृ. १४) असें एका कवीने त्याचें वर्णन केलें आहे, तर दुसरा त्या सामान्य मानवाची तुलना नागर संस्कृतीस सुखाने चालतां यावें याकरिता स्टीमरोलरखाली दाबल्या

जाणाऱ्या खडीशीं करितो (पृ. ९१). याच स्थितीचें वर्णन एकाने 'फडफडे कोंबडी, कुणीं बांधिली, टोपलींत या आणि कोंडिली! कितीतरी कोंबड्या, यांतच भरल्या, तडफड करुनी व्यर्थ भागल्या' असें केलें आहे. तात्पर्य, जीवनाविषयीची ही विफलतेची, वैषम्याची भावना ही बरीच सार्वत्रिक दिसते, व तीमुळे आलेली चीड आजच्या कवितेंत प्राधान्याने व्यक्त होते.

कांहींची दृष्टि या विफलतेबाबत वैयक्तिक आहे व तीवर त्यांची उपाययोजनाहि वैयक्तिकच आहे. कोणी 'नानापरिची अपूर्णता जनिं। जरि घडिघडि दे शांति भंगुनी। दिसल्या आनंदकणां निरखुनि मी अभंग जीवन गाइन का' अशी आशा करितो, तर कोणी 'वास्तव या विश्वास आज मी कंटाळुनि गेलें' म्हणून कुठे तरी दूरदूर जाण्याची इच्छा करीत आहे (पृ. १२). कोणी त्यावर विस्मृतीचा उपाय योजून 'लाभूं दे मजला विस्मृतीचें वरदान' असें म्हणत आहे, तर कोणी इतके अगतिक होतात की कोणताहि उपाययोजनेचा विचार त्यांच्या मनांतहि येत नाही (पृ. ४९, ५१, ७३, ९५ व १०२). कांहींची प्रतिक्रिया मात्र वैर्याची आहे व त्यांची जाणीवहि सामाजिक आहे. कोणी नवा देव व नवा धर्म निर्माण करण्यास निघतो व 'गुलाम जेथे कुणि न कुणाचें; जिथे नसे शोषण दुबळ्यांचें, राज्य जिथे समताशांतीचें' असें नवें विश्व घडवूं पाहतो (पृ. ३५). कोणी 'दुर्बळ व्हावें दलितांनी हा तर विपर्यास' अशी त्यांना चेतावणी देतो (पृ. १९). कोणी लाखांच्या जगण्यासाठी स्वतः मरण्यास तयार आहे (पृ. ५६), तर कोणाच्या 'मनाचा कणा' तारि 'कटु निश्चयें ताठ' होतो. 'समुदायाने, समुदायाने जगण्यांत ब्रह्मानंद' मानणारा कोणी तें न साधल्यास 'समुदायाने, समुदायाने मरण्यांतहि मौज' मानूं शकतो. (पृ. ७). कांही कवीस भविष्याबद्दल आशाहि वाटते. पण एकंदरींत या आशावादापेक्षा वर्तमानाबद्दल चीड, घृणा, वैताग हींच अधिक जाणवतात.

या संग्रहांतील दुसरा महत्त्वाचा विषय म्हणजे प्रेमाचा, आणि तेथेहि नैराश्य हेंच अधिक उत्कटतेने प्रकट झालेलें दिसतें. पूर्वीच्या प्रेमाच्या स्मृतींनी कोणाचें अंतर दुभंगून जातें (पृ. ४५), तर विसरून जाण्याचा प्रयत्न करूनहि कोणास तें विसरतां येत नाही (पृ. ४४). प्रेमाच्या खेळांत आपण वेडे ठरलों असल्याची कबूली कोणी देत आहे (पृ. ७४), तर कोणी आपलें नैराश्य वरवरचा खोटा हास्याचा मुखवटा चढवून झाकूं पाहत आहे (पृ. ३२). कोणी आपल्या प्रीतिदेवतेस 'भंगली प्रीति! स्मृतींची तोड ही माला पुरी' अशी विनंती करीत आहे, तर कोणी 'ती' आपल्या प्रियकरास उद्देशून "खुळी हितगुजें, खुळें प्रेम तें। विसर आपुलें खुळेंच नातें। घडायचें जे कधी न त्याचा लोभ कशास्तव धरणें" असा पोक्त सल्ला देत आहे. या नैराश्याच्या पृष्ठभूमीवर प्रेमसुखाचें वर्णन करणाऱ्या कांही कविता विरोधाने उठून दिसतात (पृ. ४६, पृ. ६६, ७८, १०५) व त्यांतील वातावरण खेळकर व सुखद वाटतें. तथापि कांहीशी प्रसंगांतील चमत्कृति व कांहीसा शारीर शृंगार यांचेंच वैशिष्टय त्यांत प्रधान आहेसें वाटतें. प्रेम हा विषय आजच्या कवितेमध्ये आपलें स्थान संभाळून असला, तरी आजच्या काव्यावर प्रणयप्राधान्याचा आणि कवींवर प्रणयपीडितत्वाचा सरसकट आक्षेप कोणासहि घेतां येणार नाही.

आजच्या कवितेमध्ये भावनेबरोबर विचारालाहि, किंबहुना तिजपेक्षा अधिकच अर्थे, महत्त्व मिळूं लागलें आहे ही गोष्टहि या संग्रहाच्या वाचनाने काव्यरसिकांस कळून येईल. रुबायां, अभंग, लाटा-लहरी, चिन्तनिका इत्यादि नांवांखाली तें काव्य प्रसिद्ध होत आहे. आजचा तरुण कवि केवल भावना-विवश नाही, तो त्याच वेळीं विचार करीत असतो. तो तरुण असूनहि 'एकाच कटाक्षीं हृदय विद्ध होण्याचे, हास्यांत लाघवी विरघळुनी जाण्याचे, केंव्हांच उलगले दिवस अजाणपणाचे' असें म्हणूं लागला आहे. सुधारणा, प्रगति, संस्कृति इत्यादि शब्दांचे खरे अर्थ तो समजावून घेऊं

लागला आहे, आणि या मोहक नांवांनी परिचित असलेल्या समाजस्थिती-मागील माणुसकीच्या अभावाचें दर्शन घेऊं लागला आहे. त्यामुळे तो अधिक गंभीरहि झाला आहे. विनोद-विडंबनाचे दिवसहि गेल्यासारखें त्यास वाटूं लागलेलें आहे याचा प्रत्यय या संग्रहांतील त्याचें अत्यंत गौण असें स्थान पाहतांच वाचकास येतो. जीवनाविषयी तो आस्थेने विचार करूं लागला आहे व यांतून कांहीतरी चांगलें निष्पन्न होईल अशी आशा करावयास जागा आहे.

या संग्रहांतील कवितेचें एवढें विस्ताराने जें मी वर्णन केलें, विशेषतः तीमधील आशय आणि तिचा विषय काय आहे हें सांगितलें, त्यावरून तिच्या अंतरंगाची कल्पना आली असेलच. ही कविता ' नव कविता ' होते काय आणि होत असल्यास कशामुळे होत आहे याचा कांही विचार करणें अपरिहार्य आहे. प्रथमतः हें स्पष्ट केलें पाहिजे की आरंभीं म्हटल्याप्रमाणे या संग्रहाचें स्वरूप अत्यंत संकीर्ण आहे. हा संग्रह केवळ ' नव कविते 'चा नाही. तिच्यामध्ये एका पोवाड्याचा अंतर्भाव झाला आहे, कवि टिळकांच्या अनुयायाची एक कविता यांत आहे, रविकिरण-मंडळाच्या एका प्रतिनिधीचीहि कविता आहे, तांबे पंथांतील कवींच्या कांही कविता आहेत, पटवर्धनी गझल आहे, त्याप्रमाणे अभंगहि आहेत. अशा या संकीर्ण संग्रहावरून कांही अनुमान काढणें खरोखर तर्कशुद्ध होणार नाही. तरीहि वर उल्लेखिलेला विचारच करूं नये असें त्यामुळे होत नाही. ' नव कवितेमुळे केशवसुतांचें युग संपून निराळें युग सुरू झालें आहे काय हाच खरा प्रश्न आहे. नवें युग सुरू व्हावयाचें असल्यास काव्याकडे पाहण्याची दृष्टि, काव्याचें अंतरंग म्हणजे त्यामधील विचार-विषय, त्याचें बाह्य रूप आणि त्यांतील संकेत हें सर्व बदलावयास पाहिजे. तसें कांही आज झालें आहे काय ? केशवसुतकालीं तें झालें होतें, म्हणून त्यास नवें काव्य म्हटलें गेलें. काव्याचें खरें स्वरूप हें आत्माविष्काराचें

आहे, म्हणजे कवीने आपल्या भावना स्वतःच्या म्हणून वर्णन करणें म्हणजे काव्य ही दृष्टि केशवसुतांनी प्राधान्याने स्वीकारल्यामुळे नवीन काव्य हें भावगीतात्मक झालें ही गोष्ट प्रसिद्ध आहे. काव्याकडे पाहण्याची हीच दृष्टि आजहि आहे, म्हणून त्याचें स्वरूपहि स्फुट भावगीतात्मक असेंच राहिलें आहे. किंबहुना त्यांतील आत्मनिष्ठेचा अतिरेक झाल्यामुळे ती कित्येक वेळा दुर्बोधहि होऊं लागली आहे. केशवसुतांच्या कवितेचें अंतरंग पाहिलें, तरी आज त्यांत अगदी क्रांति होऊन गेली आहे असें म्हणतां येणार नाही. विषमता व वैफल्य ही जीं कांही 'नव कवितें'त भरलेलीं दिसतात, त्यांचा प्रत्यय केशवसुती कवितेमध्ये येतोच. किंबहुना सामाजिक (व एका कवितेंत आर्थिक) विषमतेविरुद्ध बंड केशवसुतांनीच उभारलें होतें. समतेचा ध्वज उंच करून शांतीचें साम्राज्य स्थापूं पाहणारा नवा शिपाई आपण आहोंत असें त्यांनी आपल्या कवितांमधून प्रथम सांगितल्यामुळेच अर्वाचीन कवितेचे ते प्रणेते ठरले. व्यक्तिस्वातंत्र्यांत प्रेमस्वातंत्र्याचा पुरस्कार करून नवीन प्रेमकविता त्यांनी लिहिली आणि विचारप्रधान अशी कविता लिहून कवितेच्या आशयाला भावनेबरोबर विचाराचेंहि वजन मिळवून दिलें. आशयाबाबत विषमतेची व वैफल्याची जाणीव अधिक तीव्रतर स्वरूपामध्ये करून देण्यापलीकडे 'नव कविते'ने अधिक भर घातली असें म्हणतां येणार नाही. आजच्या कवितेचें बाह्य रूप पाहिलें असतां मुक्तच्छंदाच्या प्रभूत उपयोगापलीकडे त्याचें बाह्यरूप बदललें असें म्हणणेंहि कठिण आहे. पण याहिबाबतींत केशवसुतांनी घालून दिलेल्या मार्गानेच ती कविता जात आहे असें म्हणावें लागतें. रचनेचीं बंधनें कमी कमी करून आत्माविष्कारास सुकरता आणून देणें याकरिता केशवसुतांनी केलेल्या प्रयत्नाइतके प्रयत्न पुढील कोणा कवीने केले कीं नाही याची शंकाच वाटते. अगदी काटेकोरपणें पाहावयाचें झाल्यास मुक्तच्छंदाचा प्रारंभहि आपल्यास केशवसुतांच्या 'फुलांची पखरण', 'फुलपाखरूं',

आणि 'गुलाबाची कळी' या कवितापर्यंत मागे न्यावा लागेल. वृत्तांकडून त्यांपेक्षा सुकर अशा जातींकडे, जातींकडून त्यांपेक्षा सुकर अशा छंदांकडे, व नियमित छंदांमधून मुक्त छंदाकडे अशी ही जी मराठी कवितेची गति आज दिसून येते, तिचे सर्व टप्पे केशवसुती कवितेमध्ये येऊन गेलेले आहेत. उरतां उरला प्रश्न संकेतांचा. रूढ संकेत, मग ते काव्यांतील असोत वा सामाजिक जीवनांतील असोत, ते मोडण्याचा प्रचार व प्रयत्न केशवसुतांनी केलाच होता. प्रेमिकाची उत्कंठा व्यक्त करण्याकरिता 'नाही ज्यापरि डोंगळा कधिहि तो गेला झणीं साखरे, नाही ज्यापरि चालला कधिहि तो मार्जार खाईकडे', यासारखीं वास्तव व कोणास हास्योत्पादक वाटतील अशीं उपमानें त्यांनीं स्वीकारलीं याचाच अर्थ रूढ काव्यसंकेत मोडून वास्तव जीवनांतील संकेत आणण्याचा प्रयत्न त्यांनी केला असा होत नाही काय? प्रस्तुत सग्रहांत रस्त्यावरील खडी दाबण्याचा रूळ व खडी हें उपमान, किंवा तोंडापुढे धरलेल्या खाद्यापाठीमागे धावणाऱ्या गाढवाचें रूपक हीं वरील उदाहरणापेक्षा जातीने भिन्न आहेत असें म्हणतां येणार नाहीं. पद्यपंक्तीची तरफ करून ती जनताशीर्षावर टेकून जग उलथण्याची कल्पनासुद्धा यापैकीच नाही काय? अशा वास्तव पण गद्यसदृश व क्वचित् सौंदर्यहीन उपमादृष्टांतांनी केशवसुतांचें कवित्वहि धोक्यांत आलें. नवीन संकेत म्हणजेच नवीन उपमा व दृष्टान्त हे परिस्थिति बदलत जाईल तसे येणें साहजिक आहे. पण केवळ हे असले संकेत बदलल्याने सबंध काव्यच बदललें आहे असा समज करून घेणें हें भ्रामक आहे. त्यांतूनहि हे संकेत नवीन असले तरी सौंदर्यहीन असण्याचें कारण नाही. परंतु आपलें जीवनच भेसूर, बीभत्स, घृणा उत्पन्न करणारें झालें आहे या सबबीवर काव्यांतील संकेतहि त्याप्रकारचेच ठेवले गेल्यामुळे 'नव कविते'स सामान्य रसिक वाचक विमुख होत आहे. लोकांस जे सांगावयाचें आहे, तें स्वीकरणीय करून सांगणें याला कला म्हणतात असें केशवसुतांनी म्हटलें

आहे. याकडे दुर्लक्ष करून आपलें म्हणणें रोचक न होतां धक्का देणारें कसें होईल व त्यापेक्षाहि तें सहज न कळतां दुर्बोध कसें राहील याचीच चिंता आजच्या कवितेंतील कांही कांही कवींस लागलेली दिसते. ‘नव कविते’चा निराळेपणा जाणवतो तो सध्या तरी एवढया पुरताच. एका दृष्टीने केशवसुती कवितेचें हें अखेरचें पर्यवसान आहे. तिजमध्ये असलेल्या अनेक स्वागतार्ह गोष्टींचा अतिरेक आजच्या कवितेंत झालेला आहे. मोकळेपणा अश्लीलस्वीकारांत पर्यवसान पावला आहे; वास्तवता बीभत्सांत रूपांतरित झाली आहे, विचारप्राधान्य दुर्बोधतेंत परिणत झालें आहे, आणि रचनास्वातंत्र्य अत्यंत स्वैर झालें आहे; आणि हें सारें इतक्या प्रमाणांत झालें आहे की आजची कविता अनेकांस निराळी वाटूं लागली आहे.

हें युग मुक्तच्छंदाचें आहे, किंबहुना यांतील कविता पाहून तें स्वैरतेचें आहे असें वाटूं लागतें. स्वतः मुक्तच्छंदाच्या पुरस्कर्त्यांस रुचणार नाही एवढी व अशा प्रकारची मुक्तता या काव्यांत आहे. कोणी प्राक्षरी छंद म्हणून एक नवीनच मुक्तच्छंद यांत लिहिलेला आहे (पृ. १९). तसाच नमुना पृ. ७ वरहि आलेला आहे. तिसरा प्रकार तर असा झाला आहे की लिहायला घेतला अनुष्टुभ् छंद व तो शुद्ध साधेना म्हणून (किंवा उगाच कशाला धडपड या भावनेने असेल) त्याला मुक्तच्छंद नांव देऊन स्वैरलेखन केलें. या अनुष्टुभ्-मुक्तच्छंदांत ‘भुनक्तु सह नाववतु पुष्टिः तुष्टिच शांतिश्च.’ असें लेखन अर्थात् योग्य ठरलें. मुक्तच्छंदाबाबत घेतली गेलेली सवलत शब्दयोजनेबाबत कां नसावी या विचाराने एका कवितेंत ‘स्टीमरोलर’ आला व त्याने आपल्याबरोबर पी. डब्ल्यू. डी, थ्री-फोर्थ खडी इत्यादि आपले सहकारीहि आणले. स्वाभाविक आत्माविष्काराच्या दृष्टीने तेंहि योग्य ठरेल आणि आपल्या नागर लोकांच्या बोलण्याच्या भाषेचें तें प्रातिनिधिकहि होईल. मुक्ततेचा अधिकार शब्दांच्या रूपांवरहि

चालून तुळई, खुंटीं अशीं ईकारान्त स्त्रीलिंगी शब्दांचीं सप्तमीचीं रूपेंहि दिसूं लागलीं हेंहि योग्यच झालें. नवीन रूपनिर्मिति दोन जुन्या रूपांच्या संकराने झाली तरी तीमध्ये आक्षेपार्ह तें काय या भावनेने कलंडुनी आणि कोलमडून या दोन शब्दांच्या संगमांतून 'कोलांडुनी' हें रूप जनन पावलें. तशीच स्थिति त्वरें आणि सत्वर या शब्दांच्या संगमाची होऊन 'सत्वरें' हा शब्द निर्माण झाला. वेला शब्द वल्ली या अर्थाने वापरण्यांतहि ही स्वैरतेची दृष्टि असावी. कवि हे शब्दसृष्टीचे ईश्वर असल्याने 'तीचतीचता' ( monotony ? ) यासारखे शब्दहि तयार करतां आले. एका प्रथितयश कवीसहि यामुळे 'दुर्दैव ओढवलें' या शब्दसमूहांत वृत्ताच्या सोईकरिता 'ढ'चा आकार वाढवून 'ओढावलें' असें लिहिण्यांतहि कांही दोष नाही असें साहजिकच वाटलें. या मुक्ततेमध्ये कवींच्या बरोबर संपादकांनी तरी काय म्हणून भाग घेऊं नये म्हणूनच की काय पक्षी या शब्दाचें संबोधन 'पक्षा !' असें झालें व खगांच्या ऐवजी स्वरांचा हा शब्द येऊन बसला. सामासिक शब्द जोडलेले असावे हें बंधनहि मुक्ततेच्या या कल्पने-मुळे फार जाचक वाटलें असावें. अनुस्वारलेखनाच्या बाबतींतहि ही मुक्तता मागे नाही हें दाखविणारा पुरावा एकाच पानावर 'अंतरीची ओढ', 'तरळलें जीव' 'अंतरले अंतर', 'पाणावले डोळें', 'कातरतें मधु-स्मृति', 'नयन हें शिणले', इतका मिळाला. याबद्दल दोष कवीला, मुद्रकाला की संपादकाला द्यावा हें निश्चित करणें कठिण आहे. पण दोष देण्याचा माझा हा विचार मुक्तत्वाची महती न कळल्यामुळेच माझ्या मनांत आला असावा. मुक्तत्व कोठे थांबावें हें कोणी सांगावें व तसा अधिकार तरी कोणास आहे ? आणि शिवाय काव्य हें प्रसिद्धीकरिता दिलें जात असलें तरी मुळांत तें परार्थ नसून स्वतःकरताच असल्याने शुद्धा-शुद्धाचा हा विचार तरी कशाला ? आणि हेंहि आजच्या युगाचें प्रति-निधिक नाही काय !

आजच्या युगांत स्वप्नांतील दृष्टान्तांवर कोणाचा विश्वास बसो वा न बसो, या संग्रहाच्या संपादकांनी शेवटच्या आपल्या कवितेंत अशा एका दृष्टान्ताचें वर्णन करून निद्रादेवीने आपल्यास नामांकित आणि नवोदित कवि एकत्र आणून तृषार्त चातक-रसिकांकरिता ( कीं रसिक-चातकांकरिता ? ) काव्य-पाणपोई घालण्यास आदेश दिल्याचें सांगितलें आहे. असा आदेश देण्याचा अधिकार निद्रादेवीचा आहे कीं सरस्वतीचा आहे अशी शंका न काढतां, तसेंच चातक हे पाणपोईचें पाणी न पितां परस्पर आकाशांतून मिळणाऱ्या मेघजलावरच आपली तृषा भागवितात असा संकेत आहे हा विचारहि बाजूस ठेवून, रसिकांनी या ' संधी 'चें स्वागत केल्यास त्यांना आजच्या कवितेचें संकीर्णविकीर्ण का होईना, पण दर्शन होईल. नवनवीन कवि काव्यरचनेकडे वळत असलेले दिसतील व मराठी कवितेचा प्रवाह समृद्ध होत राहून अखंडित चालू राहील असा भरवसा मराठी कवितेच्या भक्तांस खास वाटेल; आणि दगडांच्या या देशांत कांही न पिकेल, तरी काव्यरसाचे पाझर सर्वत्र झिरपत असल्याचें दिसून येईल. हें जोंपर्यंत होत आहे, तोंपर्यंत त्याच्या जिवंतपणाविषयीं शंका घेण्याचें कारण नाही; मग जगाच्या बाजारांत ऐहिक वैभवाच्या दृष्टीने त्याचें स्थान कांहीहि ठरो. मराठी काव्यप्रेमी जन याबद्दल ' संधी 'च्या संपादकांचे आभारीच राहतील.

रा. श्री. जोग.

---

## राजकवि–रामचंद्र अनंत काळेले

(इंदूर)

### गा प्रतिभे—

गा प्रतिभे गे,
गा गा गार्णी
सूर्याच्या अन्तःकोषान्ती
अङ्गाराची लोहितकान्ती
ल्याली जाज्वल जी सरस्वती-
घे तिची प्रखर तेजोवाणी

गा शुक्राची ज्योतिःसूक्ती
घे उल्केची भरारकॢप्ती
तारांच्या रचि कवितापङ्क्ती
पसरवी प्रभा झळझळवाणी

सुवर्णकमळांना लाजविती
कौस्तुभतेजाला फिकटविती
दिवसाच्या डोळ्यास दिपवि, ती–
देदीप्तरुचा भरवी गार्नी

त्या दीप्तीचा पाडुनि झोत
माझ्या हृदयीं पेटवि ज्योत
करि रजनी–तिमिराचा स्फोट
गे, उघड वैभवाच्या खाणी

क्षीण खोल ती मिळमिळ गीती,
मिणमिण दुबळी पेंगुळपणती,
—पुरे पुरे ही दरिद्ररीती !
कां भरली अन्धेरी ग्लानी ?

प्रकाशावरी अमुची सत्ता !
सूर्यचन्द्र आमचीच मत्ता !
ऊर्जस्वल महती मानवता–
जी या भुवनाची अधिराणी !

देवाहुन तेजस्वी कांहीं–
हा मानव हो ! त्याची द्वाही–
फिरविणार जो दिशांत दाही–
कवि रवीन्द्र तो उदया आणी !

---

## शान्ता कुलकर्णी

( पुणें )

### मी माझें निर्मुनि—

मी माझें निर्मुनि विश्व त्यांत वावरतें
त्या आत्मच्छंदीं सुख मम मज सांपडतें
लागतेंच परि कधिं येण्या जनलोकांत
—मी फसतें, चुकतें, दुःखित होतें, कढतें !

---

(३)

# शान्ता कुलकर्णी

( पुणें )

## लाभेल अशी कां—

एकाच कटाक्षीं हृदय विद्ध होण्याचे
हास्यांत लाघवी विरघळुनी जाण्याचे
  अन् ' उगीच कधितरि ' हुर्हुर काहुरण्याचे
केव्हांच उलगले दिवस अजाणपणाचे !

ये नयनां पारख, गभीर मन हो आतां
ना फसत अता तें–लगेच–कुणिही हंसता
  घे वेध शरासम अचूक तें हृदयाचा
अन् जातें उबगुन थर शेवाळी दिसतां

स्नेहाचे आतां झरे इथें झुळझुळती
अनिरुद्ध शुद्ध जे गीत प्रीतिचें गाती
  तेवतात मंगल वत्सल नंदादीप
मम मार्ग उजळण्या सतत सुखें जे जळती !

तेवते ज्योत मम हृदयाच्या हृदयांत
जी गाइल अविरत तेजाचें संगीत
  तिज गौरवुनी वाढवील अपुल्या हातीं
लाभेल अशी कां या जन्मीं मज प्रीत ?

# वासुदेव गोविंद मायदेव

(पुणें)

## मम जीवनिं हा क्षण येइल का ?

[चाल—मम जिवीत कोडें सारखी]

मम जीवनिं हा क्षण येइल का ?
मम जीवन ऐसें फुलेल का ?
खांद्यांवर जीं पिलें वाढलीं
बळ सांठवुनी उडुनी गेलीं
स्मृति भेटिंत जर तिहिं न दाविली
मी तरी तयांही मानिन का ? १

चार जणांचा मान हो जिथें
उपेक्षिलें जर बळें कुणि तिथें
लवहि खिन्न नच होतां चित्तें
मी सुखें उपेक्षा साहिन का ? २

परोपरीचें जगांतलें धन
आसासुनि किति वेंचति धांवुन
आस न तिळभर त्याची मानुन
मी उगा स्वस्थळीं राहिन का ? ३

नानापरिची अपूर्णता जनिं
जरि घडि घडि दे शांति भंगुनी
दिसल्या आनंदकणां निरखुनि
मी अभंग जीवन गाइन का ? ४

# वसंतराव चिंधडे

(मालेगांव)

## लाभूं दे मजला—

लाभूं दे मजला विस्मृतिचें वरदान !
पद-चिन्हें ठसवुन कोमल हृदयावरतीं
बेइमान गेली तुडवित चंचळ प्रीती
त्या क्रूर स्मृतींनीं व्याकुल झालें प्राण
लाभूं दे मजला विस्मृतिचें वरदान !

मैत्रीचे विणिलें कोणी मोतीं धागे
पथ अन्य परंतू क्रमावयाला लागे
चालतों एकला वाट अतां वैराण
लाभूं दे मजला विस्मृतिचें वरदान !

चिवचिवले चिमणे जीव कधीं भवतालीं
ती वत्सलता परि कारुण्यांत नहाली
पहिलेंच हाय ! तें पडलें देवा दान
लाभूं दे मजला विस्मृतिचें वरदान !

आवाज कीर्तिचा दिगंतरीं दुमदुमला
फल उपेक्षेचेंच पण माझ्या येत तपाला
त्या नादीं रमतों अजून मी नादान
लाभूं दे मजला विस्मृतिचें वरदान !

सेवेस्तव केला विनम्र केव्हां माथा
तों 'प्रतिष्ठितांच्या' पडल्या शीर्षी लाथा
तो अजून धुमसे अंतरांत अवमान
लाभूं दे मजला विस्मृतिचें वरदान !

सोनेरी नगरी दूर दिसे नयनांस
त्या वास्तव्यास्तव केला दीर्घ प्रवास
पोंचतां पाहिलें—केवळ ते पाषाण !
लाभूं दे मजला विस्मृतिचें वरदान ! !
कां दिधले असल्या मला स्मृतींचे शाप ?
द्यायचाच—द्या तर—हा आतां उःशाप
कीं "तथाऽस्तु—हें तुज विस्मृतिचें वरदान !"
त्या क्रूर स्मृतींनीं व्याकुळ झालें प्राण ! !

---

## विंदा करंदीकर [ गो. वि. करंदीकर ]

( कागल : कोल्हापूर )

### हीच दैना—

सडलेल्या पंखांनाही
उडण्याचा लागे ध्यास;
हाच माझा थोर गुन्हा;
हाच माझा रे हव्यास.
आकाशाची निळी भाषा
ऐकतां न उरे पोच;
आणि गजाशीं झुंजता
झिजे चोच, झिजे चोच !
जाणिवेच्या पिंजऱ्यांत
किंचाळते माझी मैना;
तरी मुके तिचें दुःख
हीच दैना, हींच दैना.

---

# विंदा करंदीकर [गो. वि. करंदीकर]

( कागल : कोल्हापूर )

## जगण्यामध्यें ब्रह्मानंद--

बरगड्यांच्या तुरुंगांतून
मी हृदयाला मुक्त केलें;
जिथें जिथें धमनी आहे
तिथें माझें रक्त गेलें.

मेघांच्या त्या गडगडाटांत
ऐक माझे बोल खडे;
माझे अश्रू, माझे अश्रू
आकाशांतून तेंच पडे.

दिक्कालाच्या जबड्यामधील
लवलवणारी जीभ मी;
आसक्तीच्या गर्भामधलि
धगधगणारें बीज मी !

माझ्या हातांत महायंत्र;
माझ्या मुखांत महामंत्रः
समुदायानें, समुदायानें,
मरण्यांतही मौज आहे;
समुदायानें, समुदायानें
जगण्यामध्यें ब्रह्मानंद !

## शान्ताराम आठवले

(पुणें)

### जगता, तूं मानुं नको खन्त !

“ पुढे झाले जे थोर कवी त्यांच्या—
प्रथम कविता साभार परत आल्या ”
भविष्याची रेखीत रम्यचित्रें
काव्य पहिलें मी दिलें प्रसिद्धीला.

दुष्ट दैवानें काय पहा केलें
काव्य माझें छापून हाय, आलें !
थोर लेखक हा नसे नशीबांत—
म्हणुनि जगता, तूं मानुं नको खन्त !

### “ नाझी आहे आजी अपुली ! ”

शिके मराठी यत्ता तिसरी
तरी वाचतो ‘ काळ ’, ‘ केसरी ’
दादांचा तो बाळ लाडका !
हुशार चौकस गोड बोलका !

एके दिवशीं पित्यास सांगे—
“ गडी करा फू आजीसंगें !
जर्मन अपुले शत्रू असती
त्यांच्यासंगें ठेवी मैत्री !
“ स्वस्तिक काढी रोज सकाळीं—
नाझी आहे आजी अपुली ! ”

---

# सदाशिव अनंत शुक्ल

(मुंबई)

## तोड ही माला!

[ वृत्त : देवप्रिया, गज्जल ]

कां पुन्हां ही जीवघेणी मस्करीची चातुरी ?
लाघवी लीला न दावी मानभावी आसुरी !

सूर संवादी कधीं ना वाद-संवादीं जुळे
वाक्सुधेनें कां विझे ती आग जी पेटे उरीं ?

खेळ आधीं माण्डला अन् मोडला तूं तत्त्वतां
पाङ्गलेलें चाङ्गलें ! राहे वियोगीं माधुरी !

प्रीत माझी ती इमानी; जाणशी तूंही मनीं
काय पर्वा मामिली त्वां ती भली किंवा बुरी !

मोल मातीचेंहि लोकीं ना मिळे नेकीस तें
मृत्तिका रेती ठरे ती भासली जी कस्तुरी !

जीव हो घायाळ माझा, खन्त कां त्याची तुला !
सावजा दे मृत्यु घावें, ना इजा पावे सुरी !

खूप काङ्गावे नि कावे ! मोहजाळें टाकिती
रूपविद्यागर्विता या दुष्ट मायावी हुरी !

कुस्करीलीं भावपुष्पें फेंक रागानें दुरी
भङ्गली प्रीति ! स्मृतींची तोड ही माला पुरी !

---

## गं. वि. कुलकर्णी

( पुणें )

**विश्वविधात्या दयाघनाची वसती--**

तापे दिनमणि माथ्यावरती,
आग पसरतो धरणीभवतीं;
डोळे अपुले वटारतो का जीर्ण देउळावरी ?

गुं गुं करुनी भुंगा फिरतो !
कुठें पोखरत तुळई बसतो;
दुपारच्या या भकासतेला करतो अधिक विखारी !

पडक्या भिंती वाटा देती;
तुळया, खांबहि हे करकरती;
चंद्रमौळि हें वैभव दुःखा अवसर देई भारी !

पडवीमध्यें अंग टाकुनी
झोंपा काढी श्वान येउनी;
घरघर त्याची सांथ देतसे गभीरतेला न्यारी !

अंधारामधिं एकच मूर्ती;
स्नेहहीन ती एकच पणती !
भक्ताविण का एकलकोंडी हीनदीन बेजारी ?

अंवतीभंवती शुष्क तृणांचें
रान माजलें, कंटक साचे;
विश्वविधात्या दयाघनाची वसती येथ, पथारी !

## संजीवनी [ सौ. संजीवनी मराठे ]

( खानापूर )

### माहेर !

माझ्या माहेराची वाट
पानाफुलांची, फळांची,
मखमली हिर्वळीची.

माझ्या माहेरचें घर
जसें गोकूळ नंदाचें,
जग परमानंदाचें.

माझ्या माहेरची रीत
रीत ऋजू वळणाची
स्नेह आणि सौजन्याची.

माझ्या माहेरची कीर्त
लोकीं दुर्मिळ, दुर्मिळ,
कस्तुरीचा परिमळ.

माझ्या माहेरचा मान
वडिलांनीं वाढविला
आम्हां हातीं सोपविला.

माहेरची फुलवात
सासरचें निरांजन,
प्रकाशाला आमंत्रण !

---

## शान्ता ज. शेळके

( मुंबई )

### पायवाटेस—

सुंदर हिरव्या तरुराजीतुन वळण तुझें वांकडें
स्वप्नरम्य नगरींत कोणत्या नेशिल मजला गडे !

दों बाजूंना तुझ्या बहरलीं गवतें हीं रेशमी
सुमनें त्यांवर डुलती रंगुनि स्वप्नांच्या संभ्रमीं

शीतळ छाया धरी तुजवरी तांबुस गुल्मोहर
वट पिंपळपिंपरी घालती मायेची पांखर

चिमणा पक्षी कुणी करितसे किलबिल तुजसंगतीं
तुजसंगें चालतां हितगुजें प्रणयाचीं रंगती.

गोजिरवाण्या काळ्या मुंग्या धांवति रांगेंतुनी
फूलपांखरें पिवळीं जातीं मध्येंच झेंपावुनी.

झोंपेंतच रंगलें वाटतें चिमणेंसें हें जग
येथें येतां जागृत हो परि उरांतली तगमग

तुला पाहतां दाटुन येतें हृदयीं कांहींतरी
अबोध कांहीं स्मृती चाळवुन होतें मी बावरी.

वास्तव या विश्वास आज मी गेलें कंटाळुनी
दैनंदिन या चाकोरीला पुरती विटलें मनीं

तुला पाहतां अवचित वाटे यावें तुझियासवें
रमत गमत चालतां बघावे नभीं खगांचे थवे.

निळ्या प्रकाशामध्यें नाहती जिथें निळे डोंगर
त्या स्वप्नांच्या सृष्टीमध्यें ने गे मज सत्वर

दूर दूर त्या नगरीमध्यें चल गे मज घेउन
दूर कुठें तरि—जिथें गगन घे धरणीचें चुंबन !

## शान्ता ज. शेळके

( मुंबई )

### जा अपुल्या मार्गानें !

जा अपुल्या मार्गानें !
तुझ्या स्वागतासाठीं सजलीं सुंदर हिरवीं रानें !
मावळली तिमिराची रजनी
प्रकाश रविचा भरला भुवनीं
निळ्या नभीं खग गोजिरवाणे भरारती हर्षानें !
तरुवेलींवर फुललीं सुमनें
पवन जाहला जड गन्धानें
वातावरणांतुनी तरळतें चैतन्याचें गाणें !
निःश्वासांनीं कोंदटलेलें
घरकुल माझें जीर्ण जाहलें
प्रिया, तूझिया रहिवासा हें योग्य कसें मग ठरणें !
मनीं दाबितें मूक उमाळा
निरोप देतें हंसुनीं तुजला
दिसोत ना तुज भाव लोचनीं माझ्या केविलवाणे.
फुला उमलत्या, तुला कशाला-
निर्माल्याचा लोभ आगळा !
सौंदर्याला तुझ्या न साजे कुरूपतेचें लेणें !
खुळीं हितगुजें, खुळें प्रेम तें
विसर आपुलें खुळेंच नातें·
घडायचें जें कधीं न त्याचा लोभ कशास्तव धरणें !
प्रिया प्रियकरा, सख्या सुन्दरा
पराक्रमें निज नमव ही धरा
तुझिया उत्कर्षाचीं गीतें गाइन मी अभिमानें !

---

# यशवंत दत्तात्रय भावे

( बेळगांव )

## छापयंत्रांतून—

छापयंत्रांतून जन्मतात जशा
सलग सुलट सुलट ओळी
जरि खोबणींत उलटे ठसे;
वाटतें तसेंच भविष्यकालांत
उलटें जीवन होईल सुलटें
जरि वास्तवाच्या क्ष-किरणांत
दिसतें जीवन उलटें उलटें.
अनावश्यक पण मक्तेदार वीजप्रवाहाचे
वीज ओघावर जड अवजड लादतात ओझें...
उडतात सदा संयोगी वाती.
छापयंत्राला येतो झटका,
विखुरतात जुळलेले ठसे
ज मी नी व र ती.
आणि सदाची,
मक्तेदारांच्या
शिव्यांनीं जखमी, स्तुती लोभनांनीं गोंजारलेली
पुनः पुनःची पेंगुळलेली
जुळवाजुळव.
" — गाढव हाक्या
पायानें ढोसतो आणिक धरतो
गाढवाच्या पुढें
काठीला बांधली गवताची जुडी
धांवतो गाढव
धांवतो सदाचा
खावया गवत ! "

# यशवंत दत्तात्रय भावे

( बेळगांव )

## माझ्या डोईवर—

माझ्या डोईवर—
टेकाडावरच्या निवांततेच्या अवकाशांत
जमतो आहे
उद्यांउद्यांचा जीवन उन्मेष;
आणि जवळचे प्रचंड वृक्ष
    लहान झुडुपें
    गांगरलेलें भित्रें गवतहि
    कान आपुलें टवकारून माना उंचावून
    अनुभवतात
    उत्फुल्ल तनुची उत्कंठ आर्त
    नवजीवनाच्या मीलनाची आस.
पायथ्याखालून—
    आगगाडीची कर्कशशीळ घेऊन येते
    काळ्या चिमण्यांची धुसफुसलेली आदळ आपट
    चाका चाकांची मत्तगुर्गुर
    खिळ्या खिळ्यांचा भितरा राग
    तीचतीचतेची कांहीं चुकचुक
    कुंद हवेलींत सुंद संख्यावाद;
    " एक लिंबू झेलूं बाई
    दोन लिंबू झेलूं "
    तीन चार पांच लाख आणि कोटी
    परार्धाविनाची परार्ध शून्यें
    झेलूं बाई झेलूं लिंबें झेलूं......

---

## वि. म. कुलकर्णी

( सोलापूर )

### बरेच दिवसांमध्यें—

—बरेच दिवसांमध्यें कांहीं
कविता आपण लिहिली नाहीं,—
असें मनानें मनास म्हटलें,
आणि मला मग पटलें तेंहीं !
—कविता कां पण ‘ रचून ’ होते ?
कविता कमलाऐशीं फुलते,
कवि कां कोठें बनून होतो ?
‘ कवि हा जन्मावाच लागतो ! ’
खरेंच सारें—परंतु आपण
कविता कांहीं लिहिली नाहीं...
करीत होतों काय तरी मी ?
हो; मी सुट्टी होती म्हणुनी-
दोस्त-मंडळी घरची घेउनि
सफर मजेची करावयाला
गेलों, त्यांतच दिन विरघळला !
या कांहीं दिवसांतच आणिक
मनमुराद मी हंसलों, रुसलों,
मनमुराद अन् कष्टत गेलों
स्वतःसाठीं; इतरांसाठीं;
काय कदाचित्
जीवन जेव्हां कविता होते
कविता तेव्हां विसरूनि जाते

———

## शान्ताराम रामचन्द्र

( कोल्हापूर )

**स्मशानांत या—**

चल ये मित्रा—
नको अता तीं वृथा बोलणीं,
वृथा लढाई,
शून्य विश्व हो भरून येतां अश्रु लोचनीं
दुखें हृदयीं !
स्मशानांत या शत्रुमित्रता, रावरंकता,
लोपुनि केवळ अद्वैताची उरे चारुता
येथ भेटलों आपण दोघे—शत्रूशत्रू !
केशाग्रींहि न परि क्रौर्याची उठे तीक्ष्णता !
असंख्य येथें देह धुळीमधिं विसावलेले !
कबरीवरलें तव ताताच्या फूल न सुकले,
अन् माझ्या....
....ही राख अजूनहि उष्ण कालची !
आणि आपुल्या चार लोचनीं अश्रु लोटले !
दोन दिवस !-परि दोन युगांसम घडल्या घटना
मुलें पोरकीं, अनाथ झाल्या अगण्य ललना,
विश्वप्रळयिं या दुभंगलीं अपुलींही छत्रें
दोष कुणा ? जग परिस्थितीचें गुलाम अधुना !
स्मशानभूमि न; पुण्यभूमि ही !-इथें तिष्ठतां,
मातृकरापरि चंद्रकिरण हे डोंईं फिरतां,
शत्रुत्वाच्या अस्वाभाविक भिंती ढळल्या
समदुःखी जीवा, क्षण बसुं ये गुंफुन हातां !
चल ये मित्रा
क्षणभर बसुं ये गुंफुन हातां !



———

## शान्ताराम रामचन्द्र

( कोल्हापूर )

### निसर्ग दुहिता--

तूं तर निसर्गदुहिता !
नवधारामृत प्राशुन आली
पालविची तुज कोमलता !

पलिकडच्या त्या बाभळींतुनी झुळझुळणारी शीतलता
तुझ्या शरीरीं, उरीं निथळवी स्त्रीत्वाची आल्हादकता !

वरतीं, खालीं, उभे, आडवे, माळ पसरले चहूंकडे
तिथल्या गवतीं फुललेल्या तूं सकल फुलांची मार्दवता !

तूं तर निसर्गदुहिता
नवधारामृत प्राशुन आली
पालविची तुज कोमलता !

नाहीं ओळख तुझी नि माझी, स्फुरे उरीं परि भावलता
होशिल ज्याची त्याच्या हृदयीं असो मानवाची ऋजुता !

फूल तुझी तनु, फूल तुझें मन, जीवनही तव फूल बनो
नकोस येऊं जगीं आमुच्या, वनीं बहर, तूं वन्यलता !

तूं तर निसर्गदुहिता
नवधारामृत प्राशुन आली
पालविची तुज कोमलता !

---

# श्रीराम अत्तरदे

( श्रीरामपूर : नगर )

## दलिताचा इतिहास--

( प्राक्षरी छंद )

दलितांनो, कां व्हा निराश !
दलितांनो, कां व्हा हताश !
दलितांच्या इतिहासांत ऐकलेत का निःश्वास !
संघटनेमधें, सांगा, आहे ना विश्वास ! १

दलित होते का स्वप्नाळू !
निराशेचे वा जर्दाळू !
पुढं पाहिलं असतं किंवा मागंही जर का,
वैषम्याची दिसली असती जळतांना लंका. २

क्रान्तिसैनिकांनो, कां रे
उसाश्यांचे सुटतात वारे !
आंसवं इतरांचीं पुसायचीं, हा तुमचा व्यवहार—
मग कशाला गाळायचीं हीं स्वतां वारंवार ! ३

किल्मिषनाशक प्रखर अग्नी
क्रान्तिसैनिकांची वाणी,
तिथं उसासे नी निःश्वास यांना नाहीं वाव—
तुमचं भाग्य आशादायी, मग कुठं ही धांव ! ४

रक्ताच्या ठळक शाईनं
रोमांचांच्या अक्षरानं
लिहायचा ना स्फूर्तिशाली तुमचा इतिहास !—
दुर्बळ व्हावं दलितांनीं हा तर विपर्यास ! ५

# सौ. शांता शर्मा

## ( पुणें )

### जीर्ण मंदिरांतील चौघड्यास--

( जाति, चौघडा )

गाउनी गीत वर्णिसी चौघड्या रोज रोज वैभवा
चढविसी मुलामा मुक्त करें तूं जीर्ण कृतिवरी नवा

साह्यास तुझ्या एकाग्र होउनी ताशा, सनई उभी
कल्लोळ करुनिया हटातटानें निनाद नेसी नभीं

परि वळवुनि अपुली दृष्टि जरा तूं पहा बरे मंदिरीं
गातोस गीत तूं ज्या विभवाचें उरलें तें वरिवरी

जो एके काळीं निघत कराया स्पर्धा चंद्रासवें
विझुनिया दीप, तो स्तंभ गाळितो आज मूक आंसवें

उध्वस्त लागलें मंदिर व्हाया भक्त तसे बापुडे
हळु हळू उणा नैवेद्य, जाहले प्रभुमुखहि वाकुडें

अवकळा पसरली, गत विभवाचीं गीतें गासी फुका
स्फूर्तिचा पवाडा आज पाहिजे नव्या पिढीला निका

जें विलीन झालें पाशामाजीं काळाच्या पाशवी
कां गीत कोरडें सुखविल त्याचें क्षुधित हृदय मानवी

करुनिया बंद हीं गाणीं, गाई स्फूर्तीचा भैरव
नाचेल मंदिरीं भक्तकरांनीं तुष्टहृदय भैरव.

---

# कृष्ण बलवन्त निकुम्ब.

( धारवाड )

**वाट—**

[ जाति : पादाकुलक ]

उभा नभाची मोजित उंची
कठोर काळा पहाड बाजुस—
आणिक इकडे दरी पसरली
शोध घेतसे रसातळाचा

मधून माझी वाट निघाली
मुरडत वळणावळणावरती
मागुनि-पुढुनी परमेशापरि
आकाशाची स्निग्ध संगति !

कुठें घळींतिल हिरव्या, काळ्या
पाणथळींची चमके रेषा—
आपुलींच भक्षुनी पिलें कुणि
सुस्तावुन नागीण पसरली !

मधुनच येई खोल दरींतुन
घुमत गर्जना हिंस्त्र पशूंची—
पाताळाची हांकच जणुं ती
उठवी अंगावरी शहारा !

कधीं कोसळे शिला अचानक—
कड्यावरुन घे ठाव दरीचा
सान्धित जाई उजवा-डावा
दुवाच उत्कण्ठित मरणाचा !

तरिहि पुढें निःशंक चाललों
अननुभूत अनुभवीत, कांहीं–
निळसर, जांभुळ, गहन, गूढसें
हृदयिं निरंतर तरळत राही !

–मात्र कुठेंतरि कडेकडेला
पिवळीं, गवती फुलें उमलतां
थबकुनि नकळत बघत राहतों
फुलें, तुरे, गवताचीं पातीं !

---

## शरत्चंद्र मुक्तिबोध

( नागपूर )

**मनाचा कणा—**

विझून गेलेली दिसाची चिता !
संध्येच्या रक्षा ढिगाऱ्या खालीं
उरे निखारा लाल विझता.

आमच्या गल्लीचा उदास निंब
आपली मान टाकून खालीं
उभा निःशब्द ! !

कुबड्या घरांत
अपुऱ्या स्नेहाचे मरते दीप
तमास भेसूर आकार देतात.

विद्रूप स्मृतींचीं वट वाघळें
मनाच्या अंधाऱ्या पोकळींतून
गर्गर घिरट्या वेगानें घेतात.

शिल्लक आहे
कडू जहर चव दिसाची
वाहत आहे
गालावरती धार रक्ताची
भयाण चितेसारखा उभा मी
उंचेला रोड
करणें कांहींहि अशक्य ! म्हणून
खिशांत हात.

गल्लीचा कंदील उजेड देई
पिंगट पट्टा तो वाटेवरचा खोडला जाई
माझ्या छायेच्या काळ्या रेघेनें.

खिशांत हात
अंधार डोळ्यांत
मनांत खुपत
मेलेलें गीत.

...आणि समोर
निःशब्द आकार येई चालत
पराजयासम वाकली एक नारी आकृती
उडते केस; दीठ भुईस.

उदास छंद–
तशीच पाउलें टाकीत मंद
कटीस बाळ–
कादंबिनीच्या कटीवरती फिकट चंद्र !
दिसलें बाळ
दिसावें भुयारामधून कुणाला सहसा आभाळ ! !
आणि वाटलें
हासावें बाळ भोळें निर्मळ
तरीच जगणें शक्य होईल.

वेगें गेलों मी बालकापाशीं
डोळ्यांत मूर्त उभी तहान ! !
मऊ गुद्गुल्या केल्या मी त्यासी.

मातली रात्र !
बाळ तसेंच थंड राहिलें
संथपणानें वर जाऊन
स्थिर जाहलें तयाचे डोळे.

अपार होती ओसाडी त्यांत
साऱ्या विश्वाचा विषाद होता
कांपत कांपत दूर मी झालों
मला बाळाचा सवाल होता.

नाहीं हांसत आजचीं बाळें
नाहीं हांसत तयांचे डोळे

आजचें असें भयाण सत्य
त्यांच्या डोळ्यांत खुणेनें बोले.

होता अंधार
पिंगट सडा होता सांडला
निर्जन वाट
मनाचा आळा पूर्ण सुटला
...आणि सहसा कटु निश्चयें
मनाचा कणा ताठ जाहला.

---

## प्रफुल्ल दत्त [ द त्ता त्र य वि ष्णु तें डु ल क र ]

( मुंबई )

लाटा-लहरी—

एकान्त भोंवती अन् असतां तूं जवळी
आपादशीर्ष तुज ललितांगे न्याहळिली
  राहिलों दूर जरि तुजपासुनि संकोचें
अंतरिंचें काहुर शब्दांना कवटाळी
*   *   *

वसुधेचें प्राशुनि पय, हा मेघश्याम
चैतन्यें धांवे व्यापित गगन असीम
  विव्हळतां परि ती ग्रीष्मांतील रवि-तापें
फेडितो पुत्रऋण ओतुनि अंतर्याम
*   *   *

ती पतीस अपुल्या वदली, " हे कविराज
सांगतें तुम्हांला ज्यांच्याविषयीं रोज "
थबकतां जरा ती, वदला तो त्रासानें
" चल पुढें, नको तें गुणसंकीर्तन आज "
*  *  *

अभिमानें म्हणतो जे मी ' माझे ' ' माझे '
सुहृदांचें माझ्या त्यांतच प्रेम विराजे
गतिमान धरा ही राहति अंधारांत
रवि-शशी नभीं जर नसते तळपत तेजें
*  *  *

अंतरीं आजवर होती आशा एक
संकल्प सन्निधी तुझिया फुलतिल कैक
गंगौघ प्रीतिचा विरतां परि एकाकी
आमरण जीवनीं अतां चैत्र-वैशाख;
*  *  *

मिसळती हवेमधिं तुमचे-अमुचे बोल
तरळत्या पिसापरि ज्यांतिल भाव विलोल
रंगलें चिंतनीं सत्-चित्-आनंदीं जे
शब्दांवर त्यांच्या नाचतसे भूगोल.
*  *  *

हे गगन कर्मभू, जळत्या मार्तंडाची,
ब्रम्हांड युगयुगें जागवित्या वीराची
सत्कार कराया त्याचा काय निशा ही
पथिं हर्षोन्मादें उधळि फुलें तारांची

# अ न न्त आ ठ ले

( इंदूर )

**एकच रात्रीं दोन ठिकाणीं—**

एकच रात्रीं दोन ठिकाणीं
सजली शय्या, ढळली साडी
एकिकडे ' मधुचंद्र ' विलसला
दुसरी होती ' हिरवी माडी.'

एकच रात्रीं दोन ठिकाणीं
मदनाचे शतरंग बहरले
नव्या वयाची लाट उसळतां
कौमार्याचें ढेकुळ विरलें.

एकिकडे किणकिणलें कंकण
दुसरिकडे खणखणलीं नाणीं
किंतु तनूंचा तोच सोहळा
एकच रात्रीं दोन ठिकाणीं.

मानवतेच्या रचनेमाजीं
त्याच क्रियेस्तव दोन ठिकाणीं
अनंग झाला ' धर्म ' इथें अन्–
तिथें जाहला अट्टल वाणी.

एक देह मत्तेला विकला
दुजा ' सभ्य सत्तेला ' झुकला
एकच रात्रीं दोन ठिकाणीं
मळा मजेचा एकच पिकला.

एकच मातीच्या तत्त्वांनीं
दोन देह ते होते घडले
एकच तत्त्वाच्या अश्रूंनीं
होते त्यांचे डोळे रडले.

परि दोघी त्या दोन खेळणीं
ही धर्माचें–ती कर्माचें–
तोच परिक्रय तद्देहांचा
किंतु कायदा वदला वाचें–

" एकच रात्रीं दोन ठिकाणीं
रतल्या दोघी तरण्या बांड
परि ही मोठी, ती खोटी हो
एक सती ! अन् दुसरी रां... !! "

## पक्षी आणी दगड—

कुणि सहज उचलुनी दगड फेकला व्योमीं
दगडास वाटलें उंच किती चढलों मी
तों अतर्क्य घडलें-चढतां चढतां वरतीं
त्या दगडा दिसली फिरून धुळकट भूमी.

खग एक जवळचा उभारुनी मग पंख
डौलानें सोडित वसुंधरेचा अंक
उमराव स्वरांचा उडतां उडतां वदला–
" तूं कसें उडावें दगडा ? तूं तर रंक—

" या ऊर्ध्वगतीचा स्वात्मा हा अधिकारी
ही जित्या जिवाची जातीवंत भरारी
पर हस्तें वेड्या, उडशी तूं अन् पडशी
नच दगडांस्तव ही स्वर्गावरची स्वारी ! "

नभगामी तो हें वदतां बोल प्रचंड
नच ओशाळे हा पाषाणाचा खंड
नच पंख आपणा, नाहीं जीव उडाया—
या न्यून विचारें पडे न चर्या थंड

पण वदला, " पक्षा ! मला न याची खंत
तूं आत्मोन्नत ? छे ! तूं भोदु महंत—
रे, खालिंच एका येणाऱ्या दगडानें
निर्मिला अमर तो न्यूटन प्रज्ञावंत ! "

# सूर्यकान्त खाण्डेकर

( कोल्हापूर )

## काय वाहूं तुझ्या पदीं ?

काय वाहूं तुझ्या पदीं
सांग सख्या माझ्या देवा
कुठें शोधूं तुझ्यासाठीं
दिव्य अमोलिक ठेवा ? १

वनराणीच्या कुशींत
रानवेलींचीं बालकं
रुचेल कां तुला देवा
फुलांचा त्या अभिषेक ? २

सुखवितो पांथस्थांना
ज्याच्या आसरा छायेचा
रुचेल कां तुला देवा
गंध त्याच चंदनाचा ? ३

गाय पहातां लेकरां
फुटे पान्हा वात्सल्याचा
रुचेल कां तुला देवा
त्याच नैवेद्य दुधाचा ? ४

करूं काय घातपात
सांग फुलत्या जीवांचा
रुचेल कां तुला देवा
धनी होणें मी पापाचा ? ५

काय आणूं तुझ्यासाठीं ?
निर्धनता माझी शक्ति
परी तुझ्या ठायीं देवा
माझ्या जीवनाची मुक्ति ! ६

नयनींचीं अश्रुफुलें
तुझ्या पदीं झरतात
मानव्याची पुण्यगंगा
असे माझ्या आंसवांत ! ७

# पुरुषोत्तम पाटील

( पुणें )

## भल्या पहांटेला

भल्या पहांटेला अशी
जाग अवचित येते
आणि तुझी मूर्ति रम्य
नजरेंत तरळते

तुझ्या गोड गळ्यांतील
गाणीं नादतात कानीं
पडसाद हृदयांत
उठतात क्षणोक्षणीं

अंगणांत रेखलेली
नाचे चांदणी रांगोळी
होत पुसटशी पुन्हां
दाखवीत कला भोळी

तूंच लाविलेली मागें
डोले लाडकी तुळस
तूंच शिंपलेली जाई
वाटे येथ सुवासत

हुंदडती अवखळ
दोन कोठलीं वासरें
घर, परस पुरेना
येतें डोळ्यापुढें सारें

सारें...पण म्हणूं कसें
दिसेनाच कांहीं कोठें
आठवांत मधेंच ग
दहिंवर डोळां दाटे

## परक्या वाटेचा—

फुलवितों सुख ओठीं
चौघासांगातीं हांसून
वठवितों जनरीत
त्यांच्या बोलांत बोलून

त्यांचें स्वागत आतिथ्य
दाखवितों स्वीकारून
जातों वंचनेची तृप्ति
त्यांच्या दृष्टींत ठेवून

न रंगतां रंगवितों
सारा भोंवतींचा खेळ
अगत्याच्या भासासवें
त्याचा बसवितों मेळ

असाच मी त्यांच्यांतील
खोटा वरचा बरचा
मुखवटा घातलेला
पांथ परक्या वाटेचा.

# मंगेश पाडगांवकर

( मुंबई )

## उघड उघड रे दार—

उघड उघड रे दार
जोंवर अडसर उरेल तोंवर गडद भयद अंधार
असून डोळे नको अंधपण
पंख दिले तरि उरलें बंधन
स्वास्थ्य तुझें रे आज जाहलें तुझ्या शिरावर भार
उघड उघड रे दार
मोहक फसवे तुझे मुखवटे
श्वास कोंडुनी फिरले उलटे
अंतर्नादावरी सांचलें काजळ, अंधःकार
उघड उघड रे दार
श्वासें अपुल्या तव अभिलाषा
विज्ञवित ये प्राणांची भाषा
आंत असुनिही पाझर गमली तृषाच तुज अनिवार
उघड उघड रे दार
तुझ्याचभंवतीं क्षुद्र तुझें जग
फिरलें वणवण वंचनेंत बघ
अमृतमय विश्वावर उरला मुळिं न तुझा अधिकार
उघड उघड रे दार
नसलेलें दाविण्यांत मुकलें
असलेलें ऐश्वर्य तुझें रे

रितेपणीं तव तूंच निर्मिलें नकळत दुःख अपार
उघड उघड रे दार
उघड दार चल अजून अवसर
काळोखाचा निखळुन अडसर
तुझ्या स्वागता दशदिगन्त बघ प्रकाश अपरंपार
उघड उघड रे दार!

## आज नवा मी देव निर्मितों

आज नवा मी देव निर्मितों
आज नवा मी धर्म निर्मितों.
फुले माझिया नेत्रांपुढतीं
नव्या जगाची दिव्य आकृती
नव्या आजच्या रक्तासाठीं
नवी स्मृती संस्कृती निर्मितों
आज नवा मी देव निर्मितों.
श्रमबिंदूतुन कृषिक भाळिंच्या
रुधिरांतुन जीवन-वीरांच्या
अन् श्रद्धेंतून मांगल्याच्या
आज नवे मी वेद निर्मितों
आज नवा मी देव निर्मितों
देव कालचे धर्म कालचे
दास जाहले या यंत्रांचें
अन् चक्रांच्या सामर्थ्याचे
मी माझा अधिकार जाणतों
आज नवा मी धर्म निर्मितों

कुणि भंवती अन्नाविण कण्हती
कुणि चक्रांतुन पिळले जाती
बंदिघरांतुन कुणि तडफडती

अखंड मी त्यांच्यास्तव जळतों
आज नवा मी देव निर्मितों

विशाल माझी जीवन-नीती
अन् भेदांच्या अतीत प्रीती
मी मृत्युंजय कुठली भीती ?

नव्या मानवास्तव मी लढतों
आज नवा मी देव निर्मितों

गुलाम जेथें कुणि न कुणाचें
जिथें नसे शोषण दुबळ्यांचें
राज्य जिथें समता शांतीचें

असें नवें मी विश्व घडवितों
आज नवा मी देव निर्मितों.

श्रद्धा ज्यांची या विश्वावर
या भव्योज्ज्वल भवितव्यावर
या ! जे कुणि यज्ञास्तव तत्पर

मी तर केवळ यास्तव जगतों
आज नवा मी देव निर्मितों
आज नवा मी धर्म निर्मितों.

# शं क र रा मा णी

( नवा-गोवा )

## कातरवेळेला—

कातरवेळेला
पश्चिम क्षितिजीं
अंधार-तेजाचें
अंतिम मीलन;
चमकीपरी
चमकूं लागती
मधून तारका
—निळ्या जांभळ्या
आकाशांतून
सूर्यनारायण
अग्निरथांत
बसून जातांना
सहज चौफेर
उडल्या ठिणग्या.

कातरवेळेला
करीत मंजुळ
किलबिलाट
वाऱ्यावरून
धांवूं लागती
अनंत भिरीं,*
हिरवळल्या
माळावरून
संथ चालतीं
गुरें-वासरें,
सांज-सकाळ
घाम गाळून
श्रमानें थकले
जीवन जगतां
हताश झालेले
उदास जीव
चालूं लागती
घरची वाट.

कातरवेळेला
सुवासिनींच्या
करंड्यांतून
कुंकुम सांडतें
तुळशीच्या नी
वृंदावनांत,
घराघरांत
देव्हाऱ्यासमोर
लामण दिव्यांच्या
स्निग्ध तेजांत
भाविक जीवांचे
जुळती हात
आणि रोजची
स्फुरते ओंठीं
मंगल प्रार्थना
“ शुभं करोति... ”

कातरवेळेला
भोंवतीं भयाण
सांचूं लागतो
अमेचा अंधार,
घुमूं लागतें
वातावरणीं
रातकिड्यांचें
रात्रसंगीत,
आणि माझिया
विषण्ण मनाच्या
गर्भकुंडींत*
दाटून राहिल्या
गाढ तमाच्या
आशागीताचे
तरळतात
ओंठावरतीं
अस्पष्ट स्वर,
“ तमसो मा—
ज्योतिर्गमय... ”

---

* टीपः—भिरीं=पक्ष्यांचा समुदाय, गर्भकुंडींत=गाभाऱ्यात.

# पांडुरंग सूर्यवंशी

( शहापूर : बेळगांव )

## अन्दमानांतून—

[ जाति—चन्द्रकला ]

विझविलीत पणती परि कुणा आतां भय त्याचें ?
असंख्य हृदयीं या दीप हे फुलत्या निष्ठेचे !

घातलेत टाके माझिया ओठां तारेचे
परि हृदया न्यारे ओठ हे असती वज्राचे !

जखडिलेत कर हे घालुनी सर्पांनो, विळखे
गगन कवळणारे निराळे कर पण हृदयाचे !

रोधिलेत पद हे शृंखला अवजड घालून
परि पद हृदयाला आगळे ध्येयपथावरचे !

फोडिलेत डोळे ढोसुनी लाल, लाल सळई
परि हृदयां तिसरा नेत्र जो अगार ज्वाळांचे !

अरे भेकडांनो, गाढितां मजला बर्फीत
थेंब, थेंब शिजती हृदीं या परन्तु रक्ताचे !

कोंडिलेत माझ्या बांधवापासुनि मज दूर
मीलन झालेलें कधिच परि हृदयाहृदयांचें !

## माधव मराठे

### ( मुंबई )

**निवान्त इमले—**

हिरवें जावळ, करडें कातळ तटिनीतट हे नटले ग.
हिरवळिवरतीं तव चरणांचे मृदुल ठसे हंथरले ग.
पल्याड झाडित कोंब कोंवळें हळुंच कुणी कुर्तडले ग.
शुभ्र सशांचे तांबुस बुजरे क्षण लुकलुकले डोळे ग.
शतजिव्हांनीं चाटित वारा दर्हिवर दर्भीवरलें ग.
रान फुलांचे पिवळे तांबुस अधर खुले थरथरले ग.
जुनाट हे वट पसरित सावट स्मृतिकरपाशीं रमले ग.
यौवनांतले दिन रसरसले अंधुक अंधुक स्मरले ग.
प्रसन्न जलकण नदींत खिदळुन इंद्रधनूंतुन लपले ग.
दूर मळ्यांतुन घुमवित गुंजन समाधान सळसळलें ग.
उरांत तुझिया यंत्र भीतिचें, लज्जेचें धडधडलें ग.
कपोलमुकुलीं स्वेददंवाचें डंवरुन आलें जाळें ग.
अर्धस्मिताची विरल ओढणी अधर मनोहर ल्याले ग.
नयनकोटरीं दडुन प्रतीक्षा-पांखरुं भितरें बसलें ग.
पाहुन दुरुनी मूर्ति कामिनी तव, मच्चित्त हरखलें ग.
लाख केवडे नाजुक पिवळे अन्तरांत दर्वळले ग.
तुझ्याहि नयनीं पराग उलले, मधुर भाव लवथवले ग.
निवान्त इमले ते मज गमले सौख्य टेकडीवरले ग.

---

# म धु क र  ना ई क

( अहमदाबाद )

## सहृदयाची आकांक्षा—

दुःखांच्या वाहून
गोणी पाठीवर
किती हे कंठती
जीवन जर्जर!

भार तो माझ्या कां
होईना देहाला
म्हणून कोमेजे
जीव आंसावला!

चिंताच्या चितेंत
पोळून आशांची
–राख रेषा ज्यांच्या
झालीसे भाळींची-

तळमळ त्यांची
मला न जाळते
म्हणून मानस
माझें काजळतें!

पीडेचे आसूड
रुतती कायेंत
घाव ते जीव हे-
धांवती गिळीत

वळ ते माझिया
अवयवांतून
कां न उमटती
लाजतों म्हणून!

घायाळ मनींचे
उसासे करुण
भयार्त हृदींचें
स्पंदन दारुण-

दाटतात नच
माझिया उरांत
म्हणून आंसवें
माझ्या नयनांत!

मानवतेच्या या
दुःखाच्या गंगेंत
होऊं दे मजला
न्हाऊन पुनीत

पडोत तुटून
पाश व्यक्तित्वाचे
स्वार्थाचे, मदाचे
द्वेषाचे, मोहांचे

मनींच्या क्षितिजीं
तिमिर विरूं दे
सहानुकंपेची
उषा उमलूं दे!

मानवतेचीं तीं
आंसवें दुःखार्त
नेत्रांतून माझ्या
नित ओघळीत!

अन्यांच्या दुःखांनीं व्हावें मी विकल
जीवनाची यांत पूर्तता सकल!

---

# गणेश दामोदर कुडे

( अंमळनेर )

## रांगोळी—

तांबड फुटलें
शिंपिलें अंगण
दारीं सुगरण
पहाटेला.

रांगोळीची पूड
रेघोव्या उठल्या
कानावर आल्या
ओव्या कांहीं.

" यावें घरधनी
कधिंचेच गेलां
पदर हो झाला
ओला चिंब

येऊं द्या अंगणीं
पाऊलें राजस
दिलासा मनास
द्यावा गडे

बाई तूं रांगोळी
पूर्ण होत नाहीं
आसवांची ग्वाही
कुणासाठीं ! "

# गोपीनाथ [ तळवलकर ]

( पुणें )

## भेट होतां

( वृत्त-देवप्रिया...चाल-जीव तूझा )

भेट होतां आज तूझी थांबल्या साऱ्या कळा
कोंडलेल्या जीवनाचा मार्ग झाला मोकळा
वाट पाहोनी शिणोनी नेत्र झाले कोरडे
त्यास येई आसवांचा पूर आतां आगळा !
मीच सारी पुष्पसृष्टी ! मीच सारा नीलिमा !
अंबरीं मीं वाढवीला तारकांचा हा मळा
नाद येई हा कशाचा व्यापितों भूमंडळा ?
वस्तुजाताच्या तुटाया लागल्या कीं शृंखला ?
पार नाहीं या सुखाला बागडू, धावूं किती ?
मुग्ध राहूं कीं पुकारूं उंच लावोनी गळा ?
राज्य या दिव्य क्षणाचें हें असें राहो पुढें
नातरी येथेंच संपो जीवनाचा सोहळा ?

## खोडकर पाऊलवाट

ही हिरवळलेली दरी किती सुंदर
निज आलिंगन दे निळाभुरा डोंगर
पाऊलवाट ही किती खोडकर परी
जातसे धांवुनी एकांतीं त्यांचिया
नच दांपत्याची तिजला मायादया

---

# वि. अ. कुलकर्णी

( रत्नागिरी )

## आक्रंदन

ईशा ! तव घटनेचा हेतु मज कळेना.
अव्यंग न नित्यरुचिर कांहिं आढळेना. ध्रु
चंद्राला तें लांछन
पद्मिनिला पंकिं जनन
कोकिलरव
मधु अभिनव
रूप परि तया ना १
प्रीति, चारुता, शांती
क्षण भंगुर या जगतीं
सुखद ललित
परि तें नित
रम्य कां गमेना ? २
अश्रुत श्रुतिमाधुरिहुनि
मधुतर ती आल्हादिनि
हृदयंगम
समसंगम
जगिं कुठें दिसेना. ३
मंगल अव्यंग विमल
होऊं दे विश्व अखिल
प्रार्थि मनुज
परि कां तुज
अजुनि दया ये ना.! ४

# सौ. अपर्णा देशपांडे

( बडोदें )

## कवितेस—

( चालः—तुझी रातराणी माझ्या.... गिरीश )

देवि तुझ्या पूजनाची केलीसे तयारी ॥ ध्रु ॥

तुझ्या मंदीरास थोर
चालले हे सान थोर
मन माझें हेकेखोर

ध्यास घेऊनीया तुझा तुजला हांकारी ॥ देवि तुझ्या. ॥ १ ॥

नाहीं सोबती संगाती
रात किडे किर्र्र गाती
वाटमारे चोर किती

मार्ग अडवीती माझा, रात्रही अंधारी ॥ देवि...॥ २ ॥

कशी बशी झालें धीट
तुझ्या दिठीवरी दीठ
घेवुनिया आलें भेट

कुणी हिणावीती परी, 'म्हणुनी भिकारी ! ॥ देवि...॥ ३ ॥

फुलें कण्हेरी जास्वंद
मग कोठचा त्या गंध !
हांसतील निशिगंध

गुलाबांचे गेंद आणि चाफे ही सोनेरी ॥ देवि...॥ ४ ॥

शेवंतीही ओळखीची
रातराणी शेजारीची
ऐटबाज दृष्टी त्यांची

जणूं खुणावीती मातें "जा कशी माघारी" ! ॥ देवि...॥ ५ ॥

आणि येतील पुजारी
धाकें त्याच्या भय भारी !
मागतील खास द्वारीं
लांच, दक्षिणा, वा 'पास', शिफारसी भारी ॥ देवि...॥ ६ ॥
जरी राउळीं न आलें
वेडि खुळी कोणा म्यालें
माउली ! मी परी धालें
तुझी प्रेरणा अंतरीं, कोण तिथें वारी ?

---

## वसन्त अ. काळेले

(इंदूर)

### रबर—

(देवीवर)

भावनेच्या ओघामधें
नंको लिहाया,-लिहिलें
शब्द सारे सफाईनें
रबरानें मिटवीले !

अन्तर्बाह्य तूं कागद
जीवनाचा चितारला
कुठें काळाचें रबर
शक्त पुसाया त्याजला ?

---

## नारायण माधव सरपटवार

वणी ( वऱ्हाड )

### स्मृतीनें अंतर

सुनील गगनीं शुक्राची चांदणी
स्मृति ती तुझीच माझिया जीवनीं !

वयाच्या वसंतीं सहसा दिसली
संगमाची आशा वेडयाला वाटली !

सहसा दिसली लोपली सहसा
जीव आणि केला कसा वेडापिसा !

प्रवाहपतित संसार थाटला
ओढतांना गाडा जीव ये टेकीला !

सुखस्वप्नें सारीं
लोपलीं ! निमालीं !

विधाता वितरी
नशीबीं हमाली ! !

शुक्राची चांदणी
दिसतां गगनीं

स्मृतीनें अंतर
जातें दुभंगुनी ।

## सौ. शालिनी सोमण

( बेळगांव )

### न कळतां कुणालाही—

न कळतां कुणालाही
हलकेंच तूं आलास
कसें झाकलेस डोळे
मीही रोखियेला श्वास
विचारांत गुंतलेलें
मन माझें घाबरट
गेलें भांबावून पुरें
तुझें साहस अचाट
घट्ट पकड हाताची
कशी करायची सैल
तुझ्यापुढें खरोखर
शरण मी हतबल
अंधारल्या डोळ्यांपुढें
चमकतात काजवे
उरांतली धडधड
माझी मला न ऐकवे
पाहूं नको अन्त असा
सोड सोड म्हणीं डोळे
तुझ्या हाताच्या धर्गानें
माझें वेडें मन पोळें

## न रे श क व डी

( सोलापूर )

### जीव !

फडफडे कोंबडी !
कुणी बांधिली ?
टोपलींत या आणि कोंडली !

कितीतरि कोंबडया—
यांतच भरल्या !
तडफड करुनी व्यर्थ भागल्या !

येभिल ती गाडी—
कोठून तरी ती
ठेवतील ही त्यांत टोपली !

तडफडे अिथें हा
जीव कोवळा,
सुरा परजतो खाटिक कुठला ?

---

## वा. ना. त्रि ग म

( नागभीड : मध्य प्रदेश )

### पाडिलें कुणी घरटें ?

पाडिलें कुणी अमुचें घरटें ?
काळीज किती त्याचें उलटें !—
अनुपम ऊबट सुबक सानुलें
जिच्या साबलिंत वाढलीं पिलें
कुस्कराल, बनवाल न कमळें !
ही कला ज्याचि त्यालाच वठे.—१

लांब भराऱ्यांनीं त्या काळीं
काड्या कापुस पिसें जमविलीं
संतत खपुनी रचना केली
मातींत हाय तें एकवटे !—२

मी मम राणी, माझें राजस
जगा विसरलों पीत सौख्यरस
कांहिं बाधलें ना आम्हांस
वाटलें निवांतस्थळ मोठें.—३

सांज सकाळीं देव भजतसूं
दुपार दाण्यास्तव घालवितसूं
तसेंच आजहि वळलों तसुं तसुं
पाहतों काय हें ? ऊर फुटे !—४

सोसाटयाचे वारे सुटती
वादळ गर्जे, गारा पडती
वणवा पेटे ! खाया उठती
जागा न अम्हांस्तव जगिं वाटे !—५

उगें राहुनी काय व्हायचें ?
दुःखाला सुख मानायाचें !
कर्तव्यानें फुलती बगिचे
आम्हि प्रवासी लागूं वाटे ! !—६

---

# पुरुषोत्तम बाळकृष्ण फडके

( पुणें )

## " अजून नाहीं तिशी उलटली "

ज्यांना वाटे जगीं जगावें
जगण्यासाठीं त्यांना जीवन
सदा निराशा ज्यांच्या पदरीं
त्यांना जगणें म्हणजे लांछन !

हृदयांमधलीं माझ्या शल्यें
आज खरोखर अबोध सगळीं
बोलायाचीं कोणापाशीं ?
सांगूं सांगा, कोणा जवळीं—

अजून नाहीं तिशी उलटली
तोंच नकोसें झालें जगणें !
कोणासाठीं न कळे जगतों
कुठवर, कोठें नित भिरभिरणें !

उमेद नुरली, प्रतिभा विरली
आणिक बुद्धी बोथट झाली
आज खरोखर ऐन जवानी
जन्मतांच मातीस मिळाली !

---

## द्वा र का ना थ चि त्रे

( मुंबई )

### हळूंच पद टाकितां--

हळूंच पद टाकितां वसन्ता
मन हें उन्मळतें !
तुझेच पैञ्जण घडीघडीला
उत्सुक करिती अवनितलाला
हृदयीं पण मम तुझी चाल रे विक्रम गाजविते.
पूर्ण चंद्र वा अथांग सागर
निळें अभ्र वा प्रसन्न फुलवर
सोडुन मी रे, अशी एकटी निसर्ग तुडवीते.
नयन रम्य ते दुर्ग सोडुनी
मधु स्वप्नांना आड करोनी
मूक मनींची नत नजरेशीं अपुली विरवींते.
विसर जगाचा रीत आळणी
विरस परी मम करुण कहाणी
मुकी राहुनी तारुण्यातच अपुल्याशीं कुढते.
सुप्त भावना किती आवरूं
सोंग यतींचें किती पांघरूं
ताठर यौवन एकवटोनी मलाचि डावलते.
त्यांत तुझी ये प्रसन्न चाहुल
फुलाफुलांची गुम्फित मखमल
युवती युवती कर बिलगोनी आळविती गीतें.
धुन्द पाश तव मादक जर्जर
मम हृदयीं पण असह्य रे शर
तुझ्या प्राङ्गणीं युवती जेव्हां ' प्रियकर ' मिरवीते.
हळूंच पद टाकितां वसन्ता
मन हे उन्मळतें !

---

# र मा का न्त नं द गीं क र

( पुणें )

## मुग्ध आंसवें !

हीं मुग्ध आंसवें कुणा दिसतिल का ? ॥ धृ. ॥
हृदयीं पेटे आग चहुकडे
जीव करी आक्रोश बहु रडे
कुणि येउनि अग्नी विझविल का ? ॥ १ ॥
जीव तडफडे भुकेनें महा
गडबड लोळण घेतसे पहा
कुणि दयार्द्र होउनि पाहिल का ? ॥ २ ॥
अंतरिं अंधःकार कोंदला
आशेचाही दीप विझाला
कुणि वात निरांजनिं लाविल का ? ॥ ३ ॥
बाग करपली हृदयामधली
झाडें सगळीं वठून गेलीं
प्रेमाश्रु कुणाला फुटतिल का ? ॥ ४ ॥
मनोरथाची उंच हवेली
क्षणामध्यें कोलांडुन गेली
कुणि हातभार या लाविल का ? ॥ ५ ॥
गान मनाचें थिजून गेलें
वाचा असुनी शब्द न चाले
कुणि पाझर वाचें फोडिल का ? ॥ ६ ॥

# बिडेश ढवळेकर

( कोल्हापूर )

## कितीक चित्रें रंगवायचीं—

कितीक चित्रें रंगवायचीं
कुंचलीच मम अपुरी पडते
तुझ्या राजसा चिंतनांत रे
अवाचित अवघी निशा संपते !

बरसाती अनुरागाच्या नित
अखंड तुजवर कितीक केल्या
स्थानभ्रष्ट मी सुम लतिकेचें
गंगा-यमुना नयनीं आल्या !

आठव अपुली आणभाक ती
साक्ष नभींचा पूर्णचंद्र रे
साहुं न शकते तीव्र यातना
धांव जिवलगा धांव सत्वरें !

दोन नेत्रिंची निरांजनें मम
ओवाळित मी राहिन इथुनी
येशिल तूं; अन् ये ये सखया
नातरि ज्योती जातिल विझुनी !

# अ. ल. परळीकर

( मोमिनाबाद )

## नाहीं तुज कळलें का ?

( छन्द-देवीवर )

नाहीं तुज कळला का माझ्या नयनींचा भाव ?
नाहीं तुज लागला का माझ्या हृदयींचा ठाव ? १

नाहीं तुज कळले का नयनीचे मुके बोल ?
नाहीं तुज कळला का माझा सुटलेला तोल ? २

नाहीं तुज कळली का खळबळ हृदयींची ?
नाहीं तुज कळली का तळमळ अंतरींची ? ३

धडधड हृदयाची तुज नाहीं का कळली ?
आणि नाही जाणवली माझ्या देहाची काहिली ? ४

नाहीं तुज कळले का ? जडे वेड तुझे मला
झालों हृदयानें एक दुजाभाव तो लोपला. ५

नाहीं तुज कळले का ? तूं मी विभक्त न आता
काय उरलें सांगणें ? भिन्नपण तें लोपता. ६

नाहीं तुज लागला का तुझ्या हृदयाचा थांग
तुझा तुला कळे न का अंतरींचा भाव सांग ? ७

# वामन जोशी

चांदा ( मध्यप्रदेश )

## उध्वस्त स्मारकें म्हणूं नका !

उध्वस्त स्मारकें म्हणूं नका !
शाश्वती तयांची मुळीं न का ?

मृदुल गोड भावांची पखरण
करि अव्याहत, खरीच सुगरण
जिवास लावी उगाच भुलवण
मधु-हास्य-तुषारा वितरिल का ? १

इवलीशी नभिं कोर चमकली
वाटिकेंतली कळी शोभली
रम्य उषा अन् हांसत आली
नव-रङ्ग उषेचे दिसतिल का ? २

जीव-सुमन मम सुकुनी गेलें
काळानें तें पर्दी तुडविलें
गतस्मृतींचे शेष राहिले
हृदयांतिल ज्वाला शमविल का ? ३

# परशुराम शिरगोपीकर

( पुणें )

## बोरें आणि पोरें ! !

एके दिवशीं सौ. नें अमुच्या
खरीदलीं बोरें

सुंदर सुंदर गोल टपोरीं-- ;
जमलीं तों पोरें !

बसलों खाण्या आम्हीं उत्सुक
आनन्दें सर्व

निघतिल सारीं फळें चांगलीं
असा तिला गर्व.

निघतिल कैसी सरसच सगळीं ?
--दहांत एक बरें !

निघतिल कसलीं नेम न त्यांचा
बोरें अन् पोरें ! !

## प्र भा क र  ता म णे

( नाशिक )

### लाखांच्या जगण्यासाठीं....!

लाखांच्या जगण्यासाठीं,
सखे, आमुचें मरणें !
अंधारीं प्रकाशासाठीं,
सखे, आमुचें जळणें !— १

* * *

भारताच्या सुखासाठीं,
कर्तव्य, हें प्राण देणें !
मरणें भारतासाठीं,
सखे, हें खरें जगणें !— २

* * *

सांग आपुल्या पुत्राला,
‘ देशासाठीं पिता गेला ! ’
पितृइच्छा सांग त्याला,
‘ नको विसरुं आईला !’—३

* * *

भिऊं नको संकटाला,
नेत्रीं तुझ्या नको आंसूं !
देशासाठीं पति गेला,
कुंकुं तुझें नको पुसूं !— ४

* * *

ओढ दोरी, काळदूता,
फांस बसूं दे गळ्याला !
देशासाठीं फांशीं जातां,
भीत नाहीं मरणाला !— ५

* * *

गुंतली फांसांत मान,
कंठाशीं आलेंत प्राण !
देशासाठीं बलिदान,
थोडें का हें समाधान !— ६

* * *

# श्री. वि. आपटे

## (आजरें)

### जीवनसाथी—

घटिकाभर मज हसवायाला
स्नेहीमंडळ भंवतीं जमले
आणि अखेरीं तीव्र व्यथेचे
घाव घालुनी निघुनी गेले.

घटिकाभर मज प्रेमळ स्पर्शे
हंसत उमलल्या किती कमलिनी
अवचित गेल्या मिटत पाकळ्या
नाचे भीषण अथांग पाणी

घटिकाभर मज अंधारांतुन
रत्न-दीपिका कुणी दाविली
वादळांत पण ज्योत मालवे
मागें उरली रात्र काजळी.

घटिकाभर मम नयन पुसाया
कुणी फिरविले हात चिमकुले
अश्रूंच्या पण झळा लागतां
शाप देत ते दूर राहिले.

घटिकाभर मज पुण्य-जीवनीं
विमल मनानें कुणी रमविले
आणि वासना-क्षोभ उसळतां
भयाण पापच छळत राहिले.

आजीवनपण माझ्या कविते,
खरी लाभली तुझीच संगत
मम हास्याची, करुणाश्रूंची
तूं जपली ही अमोल दौलत.

जाइल जीवन अखेर विरुनी
जाइल काया दग्ध होउनी
प्रेम तुझें पण माझ्या कविते,
जगा ऐकविल अमृत वाणी.

# माधव गोविंद काटकर

## ( सोलापूर )

**उमर खय्याम—**

ओजस्वी नवथर तव प्रतिभेची किमया
भावोत्कट फुलवी रम्य रुपेरि रुबाया
  ग्रहनक्षत्रांच्या प्रखर प्रसन्न शलाका
*कार्तान्तिक उधळी विश्वगोल उजळाया

मदिरेचा घेउनि सुवर्ण-चषक करांत
अनुरक्त प्रफुल्लित रूपवती समवेत
  कवि तरल कल्पना बिलासिं हो बेहोष
सुख सौन्दर्यास्तव होउंनिया आनिकेत

सन्देश देत मधु गंध प्रसाद प्रमत्त
रे क्षणिक आयु हो सुखामधें रममाण
  तत्त्वज्ञ रुक्ष जग म्हणोत मायाजांळ
क्षण सुखें रंगवी नको उद्यांची खन्त

हृदयंगम हृद्गत आळवि तव संगीत
मानवता हृदयीं स्फुरतें आशागित

---

*ज्योतिर्वेत्ता.

# स. कृ. नेने

( कल्याण )

८

## "पंचीकरण"

( पोवाडा )

आला जादुगार भला जादुगार किमयागार बडा दिलदार
मोठा जोरदार एकाचे चार करुनि प्रकार
दावण्या लीला ना कळति अज्ञ जीवाला ।। जी जी ।।
खाकेमधि डमरू हातांत टिपरू मुखानं वाजवी पुंगी ।।
महा भुत सांगें पंचरंगी ।। जी जी ।।
या पांचांचि नामरुप गूण खूण पटवून घ्यावि पारखून ।
मग मतदान करावं खूषीनं अक्षि खूषीनं राजिखूषीनं ।। जी जी ।।
प्रथम ही धरणि दुजें तें पाणि तिज्याची बाणि चमके गगनिं
भुवनिं पातालीं ।। जी जी ।।
चवथ्याचा सूत हनुमंत तयाची किरत सांगाया वखत
बोलाया वखत नाहि या ठायां रामराया करि दीना दया ।। जी जी ।।
पांचव्याचें नाम घेतांचि साद देतांचि
गुरगूर कानिं ये साची
काय दशा वर्णु चौघांचि चारसारांची
मति बधिर नारिनरांची ।। जी जी ।।
एका परिस दुजा थोर तिजा वरि मोर चवथा शिरजोर
पांचवा न मानि कोणाचें दावेदार एकमेकांचे ।। जी जी ।।
ऐकून पुंगि नादाला विसरती भेद भावाला नमुनियां जादुगाराला
जी वदती जी हुकुमाला ।। जी जी ।।
सकलांनीं थोडा भाग आणा करुं चला पंचीकरणा
घुमवुनी आंत चैतन्या घट सजिव करुनि प्राणि घडवीला
देह बनवीला चलन वलनाला झाला बोलबाला
ना कळे तयाची लीला असा भला जादुगार आला ।। जी जी ।।

---

## वि. वा. जो शी

( नागभीड : चांदा. )

### नवी अंगाई—

बाळ राणा झोंपि जाई
गीत त्याची गात आई

उपवनांतिल आंबराई
गर्द छाया दाट राई
चिमुकलें घरकूल तेथें
मंजुध्वनि हा ऐकुं येई १

चांदण्याची शुभ्र छाया
त्यांत शोभे चांदराया
मंद पणतींतील ज्योती
चिमुकल्याला साक्ष राही. २

घरधन्याची अंगणीं
परिचिता चाहूल कानीं
सत्वरें सखि धांवुनी ये
अंतरीं बहु मोद होई ३

बाळराणा झोंपि गेला
पाळणाही स्तब्ध झाला
सखि कुणाच्या बाहुपाशीं
गोड ही अंगाइ गाई ? ४

## प्रेम विहारी

( सोलापूर )

**छेड गडे फिरुनि तार !**

आज रंगली सतार
फिरुनि गडे छेड तांर !
मंत्रमुग्ध नागापरि
डोलूं दे एकवार !
स्वर-सुंदरि खेचुनिया
घेउनि ये अवनीं या
जाउनि दे दिपुनी मज
पाहुनि सौंदर्य तिचें !
मम दृष्टी-पाशानें
आकर्षुनि मग तिजला
स्वत्त्व तिचें हरण करुन
करिन तिला बंदिवान !

---

## ग. गो. राजाध्यक्ष

( बेळगांव )

**ज्योत—**

नको ती बिजली । क्षणाची सजली ।
ज्योत ही आपुली । चिरंतन ॥
रक्ताच्या तेलानें । मनाच्या वातीनें ।
प्रेमाच्या अग्नीनें । पेटविली ॥
तम सदोदित । अशा कोनाड्यांत ।
ज्योत ही तेवत । राहो सदा ॥
वाढत्या आकांक्षा । मनाच्या अशाच ।
सफल होवोत । ज्योतीनें ह्या ॥

---

# सौ. प्रमिला भागवत

( नागपूर )

**काव्य नदी—**

स्वप्नांच्या शैलांत जन्मली
काव्य नदी खळखळा चालली ॥ ध्रु. ॥

कल्पकतेच्या कड्यावरतुनी
झेप घेतसे ती डोलानीं
प्रतिरोधा रोधून धावली ॥ १ ॥

शब्दांचा खळखळाट सुंदर
रसिक थांबतिल ऐकून क्षणभर
स्तुति सुमनांची वृष्टि जाहली ॥ २ ॥

भाव जलाचे अर्पून जीवन
देइ मानवा जी नवजीवन
मने उपवनें जिनें फुलविली ॥ ३ ॥

प्रवाह काव्याचा हा अविरत
दुथडी भरुनी राहिल वाहत
कधि न कुठेही शुष्क जाहली ॥ ४ ॥

जोमाचा जणूं धवल फेस हा
उत्कंठतेच्या लहरि ह्या पहा
दैवी सौंदर्यानें नटली ॥ ५ ॥

# महादेव भिमाजी कुलकर्णी

( ओगलेवाडी )

## करुणरसाचा कहर !

कवीनें कविता । वाचाया दिधली
तयाच्या मतानें । करुण रसाची
उत्सुक लोचनें । तयाचीं तेधवां
न्याहाळूं लागलीं । वाचीत असतां
कविता सामान्य । अशुद्धें उदंड
अक्षरें कीरटीं । कागद फाटका
करुण रसाचा । 'मन्यू' ही नाढळे
चक्र व्यूहांतरीं । शोधूनी शोधूनी
वाईट वाटलें । काव्य तें पाहून
खिन्नता ही माझी । कवीनें देखीली
वाटलें तयाला । आपुल्या काव्याचा
प्रभाव दांडगा । यांत ना संशय
आनंदें तो कवि । भाबडा बापडा
हर्षानें तयाचें । भानही हरपे
ओढिला कागद । माझिया करींचा
धावत निघाला । मासिकीं छापाया

* * *

करुण रसाचा । कहर होउन
शारदा देवीनें । गाळिलीं आंसवें

## ल. वा. पडोळे

( नागपूर )

## सावधानरे, सावधानरे !

( मुक्तछंद )

कमाल पण ह्या विज्ञानाची
सुधारणेच्या लागुनि नादीं
भस्मासुर तो उदया आला
आणि मानव गुलाम झाला.

शस्त्रास्त्रें अन् यंत्रं निघालीं
नि छातीवर दाबुनि बसलीं
बुद्धि नि शक्ति ठेवूनि खुंटीं
मानव नाचे तारेवरती !

कीं, चक्करखा जणू घड्याळ
कसलें जीवन हालच हाल !
विकास कीं, हा असे विनाश ?

जोंवरी श्वास तोंवरि आस
आशेंतुनि घे जन्म हव्यास
हव्यास करीतो सर्व विनाश !

सूत्र जगाचें हें अविनाश
परि ओरडें जग विकास !

—एका बाजूस बुद्ध नि गांधी
दुसऱ्या बाजुस शोध नि क्रांति !
चढाओढ ही स्वार्थि, निर्दय
भविष्य दिसे अंधःकारमय !
" सुखी व्हावया परता मागें
सावधान व्हा ! अतांच जागे ! ! "

---

# गो पा ळ  टा क ळ क र

( पुणें )

## वाट !

अंतरीची ओढ माझ्या
नयनांत पाणावली
स्मृति तुझी मधुरशी
हृदयांत प्रवेशली ॥ १ ॥

विरहाच्या वणव्यांत
ओणवली देहवेला
कोमेजली, सुकलेली
श्रांतलेली तुझी बाला ॥ २ ॥

मधुरशा सहवासीं
तरळलें जीव दोन्हीं
अंतरले अंतर हें,
मंतरला जीव कोणीं ! ॥ ३ ॥

वाट आतां पाहूं किती
पाणावले दोन्हीं डोळे
राजसा ये, सखया ये
अंतरींचे भाव भोळे ॥ ४ ॥

काळजांतली काळजी
कातरतें मधु-स्मृति
विस्मृतीला विराम दे
नयनाला पडे भ्रांती ॥ ५ ॥

नयन हें शिणले रे
आतां लाविशी उशीर
तारुण्याच्या कलिकेला
आतां साहवेना धीर ॥ ६ ॥

---

## सौ. आशा गाडगीळ

( पुणें )

### चांदरात संपली—

मावळलं चांदणं, चांदरात संपली
अधरीचे तुझ्या प्याले
अमृताचे रिते झाले
माझ्या गालीं ओठीं त्याची, खूण अजून राहिली ॥

तुझ्या दृढ आलिंगनीं
काया माझी विसावली
तुझ्या धुंद निश्वासांनीं, धुंद माझ्या डोळीं आली

आला चोरपाउली
अरुण गवाक्षांतुनी
कुजबुजला माझ्या कानीं, चांदरात संपली

# मनोहर शंकर जावडेकर

( पुणें )

## देव

घण् घण् घंटानाद
हवा कां रे करायाला ? ।
जगत् चालका तूं रे
मंदिरांत कां झोपला ? ॥ १ ॥
झांज घंटा शंख टाळ्या
हव्या कां रे वाजवाया ? ।
ओरडुनी कां रे तुला
हवे प्रभो जागवाया ? ॥ २ ॥
वेडगळ आमुची ही
समजूत रे अडाणी ।
हृदयांतला रे ईश
आठवीना कसा कुणी ? ॥ ३ ॥
देव नाहीं मंदिरांत
देव नाहीं कफनींत ।
देव नाहीं बैरागयांत
देव नाहीं वैरागयांत ॥ ४ ॥
देव आहे जगतांत
ज्ञाननेत्रें पहा हरी ।
देव आहे हृदयांत
पूजा तो मनमंदिरीं ॥ ५ ॥

# वा म न रा व  नि पु ण गे

( पावळ )

## थांब जरा ग—

नकोस जाऊं अशि तोऱ्यानें थांब जरा गऽनवबाले

कामुकतेचे चंचल मासे नयनसागरीं तळमळले
छे नयनांचे तलाव जणुं कीं मादक मदिरेनें भरले
अन् नजरेचें नाजुक पातें हृदयीं माझ्या हळु शिरलें !

मदनाच्या मधु मकरंदानें उरोज उन्नत मुसमुसले
करि अंचल हा प्रदर्शन खुलें तव ज्वानीचें कुतूहलें
काय म्हणूं मी वयांतलें हें वेड कि यौवन मोहरलें !

स्थिरावतां क्षण नेत्र तुझ्यावर कशास हंसशी मोहक तूं
तुला न कळला असेल अजुनी माझ्या मनिंचा पण हेतू
म्हणुन हटकलें तुला बोल गऽ कांहितरी तें मनांतलें !

---

# प द्मा क र आ ळं द क र

( सोलापूर )

## मी ग वेडी माझ्या माहेराची—

मी ग वेडी माझ्या माहेराची
सासरीं आले शहाणी होउन
मी ग बोबडी माझ्या माहेराची
सासरीं आले वाक्‌चतुर म्हणून
माझ्या ग माहेरीं मी धांदरट
सासरीं आलें कशी गंभीर शांत
मी ग खोड्याळ माझ्या माहेराची
सासरीं तेवते सद्‌गुणाची ज्योत
माझ्या ग माहेरी मी नागडी उघडी
सासरीं माझी नऊ वारी लुगडीं
माझ्या माहेरीं मी मैत्रिण सर्वांची
सासरीं मात्र एक माझ्या मनींची
माहेर सासर कितीसें अंतर
ज्यामुळे झालें हें असें मतांतर
माहेरीं माझा जन्म देवाची इच्छा
सासरीं माझं येणं श्वशूर-परीक्षा
देवाच्या इच्छेला प्रेमाचें अधिष्ठान
श्वशुराची परीक्षा व्यवहार ज्ञान

# कु. प्रमिला वैद्य

( पुणें )

## पृथ्वीवरचे पांच हिरे !

पृथ्वीवरचे पांच हिरे
मला लाभले, मला लाभले

द्रुपदाच्या ग, दरबारामधिं जमले वीर हजार
उभी राहिलें होतें सखये करांत घेउनि हार ॥ १ ॥

मीनाच्या त्या नयनाला परि, कुणी मारिना तीर
अश्रू नयनीं उभे ठाकले, धडधडला ऊर ॥ २ ॥

अर्जुन आले घेऊनि हातीं धनुष्य आणिक बाण
तीर नेमका नयनीं रुततां झालें मी बेभान ॥ ३ ॥

जीवन माझें धन्य जाहलें पडतां हार गळ्यांत
पांच-पतींची पत्नी झालें धर्म-नीतिच्या व्यापांत ॥ ४ ॥

## विनायक विश्वनाथ वाड

(नाशिक)

### स्नेहमय ज्योत!

एकलाचं वृक्ष एकल्या बनांत
महान तपस्वी गढला तपांत

आले पक्षीगण चारही दिशांचे
भाव एकरूप जाहले तयांचे

अनेक जातीचे, अनेक पंथांचे
असती परी ते उदार मनाचे

पाहून जीवित दोन दिवसांचें
विसरले भेद जातींचे पंथांचे

येणाऱ्या काळाची नच त्या कल्पना
दुःखही न त्याचें निष्पाप जीवांना

सहवास संपे मावळता निशा
गगनीं क्षणांत उजळता उषा

गेले ते उडून सारे पक्षी गण
अंतरीं ठेवून स्नेहमय कण

होता न एकता वैराण जीवित
मालवेल कशी स्नेहमय ज्योत!

## म. स. आपटीकर

(सातारा)

### बाल्य, तारुण्य नी आतां—

मधुमासामध्यें
आम्रतरूवर भूपाळ्या गाऊन
गंधर्व होते जागवीत आम्हां
आणि स्वर्गीचें अमृत सिंचून
घडवीत होते आम्रफळांना.
पहांटवेळीं
वेलींवलींच्या मधुर कळ्यांना
हांसवीत होत्या गंधर्वकन्या
वनराई जणूं पऱ्यांची नगरी भासली तेंधवां
मंदिरांत तेव्हां नांदत होता खराखुरा देव.

परंतु नंतर
शैशवांतील मयनगरी अस्फुट झाली
आणि आकांक्षांचें विशाल विश्व पसरलें पुढें
ध्येयाचे हिमाद्रि भासले सान
सजलों घालाया गवसणी नभा
प्रीतीचा मंजुळ कंकणध्वनि
पळवीत होता पुढतीं पुढतीं
ध्येयपथावरीं

आणि आज झालें
सत्यसृष्टीचें
विराटदर्शन
शैशवांतल्या गूढ कल्पनांचीं
सोनेरीं पांखरें
पंख उभारून उडून गेलीं
असीम अंबरीं
यौवनांतल्या भव्य आकाक्षांचीं
स्वर्गीय स्वप्नें
नित्य वाढत्या जीवनकलहीं
विरून गेलीं
माघामधल्या वादळवातें
विझविले सारे
कोमल प्रीतीचे स्नेहाळ दीप
उरली काजळी
बाल्यसुलभ निरागसता
लोपली आज
ध्येयशून्य नी निष्प्रेम जीवन
वठल्या वृक्षाचें
जगतों आहें.

## पण्डित आवळीकर

( कोल्हापूर )

**मी तर ठरलों वेडा ग—**

मी तर ठरलों वेडा ग—
धुंद केतकी तूं बनांतली
तुझ्या तनूला तलम मलमली
पडला भुजंग वेढा ग—
तुला पुरेपुर डोळे फसले
भुजंग सगळे मजला हंसले
घालत सवाल तेढा ग—
अखेर हरलों सवाल मिटला
तुझा अनामिक संशय फिटला
मी तर ठरलों वेडा ग—

---

## राजाभाऊ [ पेंडसे ]

( नागपूर )

**तुझें गीत.**

अधरींच राहूं दे तव गीत ॥ धृ. ॥
कंठ तुझा ग कोकिळ चोरिल ।
गान तुझें ग गायक गाइल ।
कुणि टीकेचे बाण ग मारिल ।
गातेस काय तूं भयभीत ? ॥ १ ॥
प्रिया अपुल्या मोहवी गानीं ।
गाउ नको ग दुजाच कानीं ।
नाहींतर तूं मूक राहुनि ।
हृदयींच राहूं दे तव गीत ॥ २ ॥

---

# मधुकर रानडे

## ( पुणें )

### वाटतें जावें दूर—

मजला वाटतें जावे दूर ॥
निसर्ग पहातो
हृदय छेदण्या
अंतरिं दाटें काहुर—
निर्मुनी पुष्पांना
लावितो झुरण्या
देव तो पत्थर चूर—
वसंत ऋतूला
येथें ठेवोनि
पसरी तो प्रीतीपूर—
भाटांची जोडी
नभि विहार करी
मानव एकला दूर—!
ओढा नदीला
नदी सिंधूला
मिळोनि काढिती सूर—
दीन भिकारी
भैन दुपारीं
उपाशीं बडवित ऊर—
वस्तू जिवाला
वाटते घ्यावी
क्षणांत बदलतो नूर—
जीवा शिवाची
एकी ऋतूंत
अमर न राही मधूर—
प्रीती मृगजळ
करितें खळखळ
मनासि लागे हुरहूर—
जीवाचें जगणें
जीवाचें मरणें
शेवटीं निघतो धूर--
नांव अमर
मागें ठेवोनी
वाटते जावें दूर !

# रा. ग. जाधव

## ( पुणें )

**कवीच्छा—**

जाळत आहे जेथ जागृती
तेथ विस्मृति पेरत जावी
जेथ दंगली विश्वविस्मृती
तेथ घुमवणें जागृत सनई ॥ १ ॥

साज सारुनि दूर जरासा
चमचमता गगनीं तारांचा
फत्तर बघणें आंतआंतले
आणि शोधणें झरे त्यांतले ॥ २ ॥

भोळे वेडें गान उषेचें
संध्येचें वा लाजलाजणें
क्षितिजाचें तें उगाच हंसणें
खोडसाळ वाताचें घुमणें-॥ ३ ॥

दूर दूर सारून तयांना
आंत पाहणें जीवनतेजा
तिमिर ग्रासतो जेव्हां साऱ्यां
शोधशोधणें तया तयांना ॥ ४ ॥

जळत राहिले आहे जेथें
जीवन ग्रीष्माचें दाहानें
तेथे साहुनी दाह तयाचा
गायन गावें त्याला त्याला ॥ ५ ॥

जाळत आहे जेथ जागृती
तेथ विस्मृति पेरत जावी
जेथ दंगलीं विश्वविस्मृती
तेथ घुमवणें जागृत सनई ॥ ६ ॥

---

# द त्त मा ध व

## ( पुणें )

**असें कसें ?—**

प्रेमें म्यां पाळिलीं वाघीणीचीं पिलें,
त्यांनींच भक्षिलें; अंतकाळीं ।
दूध पाजुनिया सर्प जगविला,
दंश परि केला; त्यानें मज ॥

आवडीची माझी जी समशेर,
तिनेंच अखेर घात केला. ।
पांथस्था दिधली बसाया ओसरी,
त्यानें माझ्या घरीं; चोरी केली ॥

कल्याणाचा मार्ग जयां मी दाविला,
विपत्काळीं झाला; शत्रू तोच. ।
असें कसें देवा ! दैवाचा कां गुण,
तुझी तरी वाण; पडो नेदी ॥

# विनायक लाड

## ( पुणें )

### चवथीचा चंद्र अन् चोरी—

भला भाद्व्याचा मास । सणासुदीचे दिवस
गौरी गणपती घरास । येतात ना ! ॥ १ ॥

जेवतांच चवथीला । आई बोलली मजला
आज कोठें फिरायाला । जाऊं नको ॥ २ ॥

सहजी चांद पाहशील । आळ चोराचा येईल
फट्फजीती होईल । फुकाफुकी ॥ ३ ॥

आज्ञा आईची झालेली । स्वारी घरींच राहिली
खोलीमध्यें वस्ती केली । दिनभरीं ॥ ४ ॥

* * *

भेटायाला रजनीला । नाथ तियेचा चालला
काऊ चिऊ घरव्याला । परतले ॥ ५ ॥

तोंच दार ढकललें । मंद पाऊल वाजलें
हलकेच आंत आले । कोण बरें ? ॥ ६ ॥

ओहो ! चंद्रमा दिसला । आळ चोरीचाही आला
माल गळ्यांत पडला । दुज्या क्षणीं ॥ ७ ॥

* * *

कोण सांगेल आईला । अशा गुपचूप गोष्टीला
तुम्ही 'लाड'के तुम्हांला । सांगतसे ॥ ८ ॥

---

# शंकर श्रीपती कुऱ्हाडे

( बुलबुल ) अकोला

## दिलरुबा !

दिलरुब्याचीं कंपनें हीं फक्त येथें सात होती
अन् मनाच्या दिलरुब्याच्या लाख तारा छेडती

जीवनाच्या माधुरीचे राग नाना गाइले
दिलरुब्याच्या गोड छंदें चित्त माझें भारिलें

नाद लुब्धें गुंग झालों संगिताच्या रंजनानें
रोमरोमीं भावनांचीं जाहलीं आंदोलनें

तूं दुज्याच्या दिलरुब्याच्या मात्र तारा छेडशी
गान लुब्धें धुंद बनुनी स्वैर पिंगा घालशी

सेवुनीया वारुणीला लाख वाद्यें वागवी
जीवनाची लूट करुनी घे क्षणाची वाजवी

तार तुटली दिलरुब्याची नाद नाहीं थांबला
भावनेचे कंप होती भाव दुःखी त्यांतला

थांबती ना कंप तीचे चालली आंदोलनें
जीव कंठांतील जातां बंद होतीं कंपनें !

---

# धोंडो विठ्ठल पोतनीस

## ( बार्शी )

## कां न लोकीं वंद्य तो !

द्वैत हारी, दंभ सारी, देश तारी, शीघ्र तो
हो जनांतें मान्य तो;
कर्मयोगी, वीतरागी, जो न भोगी, दांत तो
कां न लोकीं वंद्य तो ! १

प्रीत देई, चित्त घेई, दैन्य नेई, दूर तो
भूतमात्रीं नम्र तो;
सत्य सेवी, आस ठेवी, मार्ग दावी दिव्य तो
कां न लोकीं वंद्य तो ! २

शील पूजी, नीत पाजी, मर्दगाजी धीट तो
सज्जनांचा धीर तो;
भ्रांत फोडी, ज्ञान जोडी, क्लेश झाडी, सिद्ध तो
कां न लोकीं वंद्य तो ! ३

विश्व ध्यानीं, ध्येय गानीं, आत्मदानीं मग्न तो
धर्म मूर्ती साच तो ;
जीव होडी पैल सोडी, मोक्ष जोडी, संत तो
कां न लोकीं वंद्य तो ! ४

तो महात्मा, तोच योगी, थोर ज्याची संस्कृति
तोष दे त्याची स्मृति;
तोच साक्षात् देवराणा, बोल त्याचे कीं श्रुति
भव्य त्याच्या सत्कृति.
कां न वंदूं त्याप्रती ! ५

# राजकवि यशवन्त

## ( पुणें )

### वयोमान कां गणूं ?

'बसूं लागलीं – बसूं देत कीं
गालफडें पुरतीं खालीं

पिळुन काढल्या लिंबाच्या जणुं
वाळुनि गेलेल्या साली

डोळे थिजती – थिजोत, विझुनी
जाउं लागल्या जणुं पणत्या

त्वचेवरी सुरकुत्या दाटती--
–दाटुं देत आणिक पुरत्या

कंबर वाकावया लागली—
–खुशाल होवो तिरकमटा

देहाचें ह्या चिपाड होवो
फिरुन वर्षांचा वरवंटा

वैगुण्यांची करावयाची
फिकीर इतुकी कां म्हणुनी

तरतरीतपण जरी मनाचें
उणें न रतिभर तें अजुनी

अजुन मनाची कूस असे क्षम
जन्म द्यावया स्वप्नांना

कितिहि लागल्या जरी घावया
तत्पर घाया तरि येणा

क्वहि न शिवला थंडपणा जर
धगधगत्या आकांक्षांना

आणि कल्पना अजुन उसळते
कवळाया नक्षत्रांना

नव्या नव्या अनुभवा भिडाया
अन्तर्यामीं ओढ जरी

बहिरूपांतिल कमतरतेची
खन्त एव्हढी कोण करी !

विचारशक्तीसवें अहर्निश
शक्त व्हावया रममाण

वयोमान का गणूं ! असे मी—
जवान तोंवरती पूर्ण.

---

# वामन भार्गव पाठक

( पुणें )

## अध्यापक चर्चा मंडळ

( एक कहाणी )            ( अनुष्टुभ्–मुक्तछंद )

जीवनास प्रवासाची देतात उपमा कुणी !
सार्थ ती वाटते मातें–सांगतों एक कहाणी ॥ १ ॥
पुण्यपत्तन विद्येचें माहेरघर शोभतें
ज्ञानदान किती संस्था त्यागानें करिती तिथें ! ॥ २ ॥
संस्था, नच, ज्ञानोद्यानें विद्यार्थि-भृंग लोभती
दाही दिशेंतुनी जेथें, मिळवितात समुन्नति ! ॥ ३ ॥
बोलते ज्ञानकोश जणुं, प्राध्यापक बृहस्पति
काव्यशास्त्रविनोदानें काळ सोत्कंठ कंठिती ! ॥ ४ ॥
त्यागाचें दिसते त्यांच्या लोचनांत किती जल !
वलयांत प्रकाशाच्या शोभतें सूर्यमंडळ ! ॥ ५ ॥
त्याचिया भिन्नता देहीं–सर्वांचें मन एकच.
त्यांचिया भिन्नता गेहीं–कार्यालय अभिन्नच ! ॥ ६ ॥
भिन्न मार्ग जसे अंतीं राजरस्त्यांत लोपती
साधनें भिन्न तीं त्यांचीं, एका 'ध्येया'स गांठिती ॥ ७ ॥
एकत्र जमती केव्हां साप्ताहिक महोत्सवीं
विदग्ध भाषणीं टीका स्फुरे त्यांची नवी नवी ॥ ८ ॥
वदे कोणी 'स्वराष्ट्राचा दर्जा नैतिक लोपला !'
सांथ त्यास कुणी देई "अहो काळच कोपला !" ॥ ९ ॥
"राजकारण तज्ज्ञांचें राखीव क्षेत्र पाहिजे
तत्त्वज्ञानी स्वदेशाचा पंचप्राणच जाणिजे ॥ १० ॥

" ब्रह्ममायादिकांचीं ती आज व्यर्थाचि जल्पना
भूक भागेल कां सांगा प्राशुनी काव्यजीवना ? " ॥ ११ ॥
अर्थशास्त्रज्ञही त्यांच्या मदतीस सरे पुढें
' पांडित्य साहसात्रीना '–म्हणे ' केवळ बापुडे ! ' ॥ १२ ॥
" वर्तमान धरा हातीं पाहूं मागें पुढें नका
कार्यकर्ता पुढें जाई संशयात्मा मरे फुका " ॥ १३ ॥
कलेसाठीं कलेचा जो एकनिष्ठ उपासक-
रूक्ष नीरस ही चर्चा त्यांस वाटे निरर्थक ॥ १४ ॥
" कला क्रीडाच ही आहे जीवनाची खरोखरी
सौंदर्य यातलें शोधा उभें राहूनिया दुरी " ! ॥ १५ ॥
शास्त्रज्ञांस नको वाटे हा काथ्याकूट निष्फळ
परब्रह्म जसे सोडी प्रकृतीलागि केवल ! ॥ १६ ॥
युद्धोत्तर महाध्येयें पक्षपक्षांतले लढे
संप शासित शास्त्यांचें प्रश्न तात्त्विक जे खडे ॥ १७ ॥
चापल्य सूक्ष्म बुद्धीचें चालवून अशांवरी
मार्गदर्शन देती ते अनाहूत परोपरी ! ॥ १८ ॥
' परोपकाराय पुण्याय ' साधूचीं जीवनें अहो,
फलें जीं आत्मतृप्तीचीं त्यापुढें ' मोक्ष ' काय हो ? ॥ १९ ॥
आणायास विचारांचीं ध्येयें प्रत्यक्ष वर्तनीं
नित्य तें करिती चर्चा ' सुसंस्था ' एक निर्मुनी ॥ २० ॥
एकत्र प्रत्यहीं यावें, करावीं हृदयें खुलीं
साधावीं सद्गती लोकीं स्वतः आपण आपुली ॥ २१ ॥
सभासद हिचें जाणा मर्यादित जरी वरी
ध्येयाच्या दृष्टिनें सारे अमर्याद खरोखरी ! ॥ २२ ॥
वेदोक्त मंत्र ते त्यांचें ब्रीदवाक्यहि एकच
"भुनक्तु सहना ववतु" "पुष्टिः तुष्टि च शान्तिश्च ! " ॥२३॥

## ना. ग. जोशी

( बडोदें )

### एक सुनीत

" भोंतीं काल-कराल मेघ उठले, आभाळ कोंदाटलें,
किंचित् पिंगट नागमोडि बिजली आतां कडाडेल का!

कोणासी करपून टाकिल हरे! दुर्दैव ओढावलें!
जाती कानठळ्या बसून, ठणणे मेघोदरीं गर्जना;

कां तुम्ही प्रळया अशांत हृदयें आवाहितां? ना कळे!
तेणें सिंचु शकाल काय जगतीं स्वातंत्र्य संजीवना?"

बाहूं द्यात खुशाल; जाणत अम्हीं—मेघान्तरीं आर्द्रता
कांठोकांठ भरे, सुतप्त भुइच्या दाहास ती शांतवी;

जो दावी घन घोर नाशक महापूरें जगा रुद्रता
सिंचूनी सुजला-सुपकि-सुफला तोची मही शोभवी;

भेदी जी गगनास तीच उजळी विश्वास विद्युल्लता,
जेणें कंपित तोच गर्जे डमरूनादें जगा जागवी!

जो 'रुद्र'त्व विनाशकार्यि नटवी संहारमूर्ति 'हर',
तो दावीत विकासकार्यि 'शिव'ता हालाहलें 'शं'कर!

## गजानन लक्ष्मण ठोकळ

( पुणें )

**परवाचा**

( चालः—परवाच्याची )

नाहिं आजचा, नाहिं कालचा, भगदिंच परवांचा
कशी मी घोकूं प र वा चा ?
सहा दुणे बारा, चार त्रिके बारा
तीन चोक बारा, गोंधळ हा सारा
एकच बारा पाढ्यांतुन या किती फिरायाचा !
एक पाव पाव, एक दिडे दीड
पावकी, दिडकी सारी गिचमीड
रोज रोजचा हा परवाचा, त्रास किती याचा !
कुणि हे लिहिले बाराखडि-पाढे ?
अंकलिपिवाले शहाणे का वेडे ?
कसा घेतला मक्ता यांनीं अम्हांस छळण्याचा !
आइ मला सांगे, 'बस घोकायाला'
दटावुन बाबा जाति फिरायाला
आम्हीं पडलों लहान म्हणुनी धाकच सर्वांचा !
अंगणात आल्या शेजारच्या पोरी
खेळतात सारे, मला पण चोरी
दगड मारुनी झाडावरल्या पाडतात चिंचा
पांच एके पांच, वाचले कीं पांच !
पुरे परवाचा, उठतें आतांच
रुसतें, फुगतें, जाऊन धरतें आईचा ओचा !

## वा. रा. कान्त

( औरंगाबाद )

### चांदणें इथें अश्रु ढाळितें—

सावल्यांत कवडशांत कोणी व्यथित मनें हिंडतें
चांदणें इथें अश्रु ढाळितें
जें निश्वासानें कधीं न कोमेजलें
आंसवीं कुणाच्या जें न कधीं चिंबलें
दुःखानलिं चुकुनीं जें न कधीं पेटलें
तेंच चांदणें सुरूतरूंतुनि, गुलाबांत फुंदतें
चांदणें इथें अश्रु ढाळितें

२

जें ऊर्वशिच्या चिरतरुणस्मितिं जन्मलें
विष पिउनि 'मिरे'च्या भजनीं जें गुंजलें
रतिनयनीं, मदनासवें जळुनि प्रगटलें
तेंच चांदणें पुष्करणींतटिं मुसमुसुनी क्रंदतें
चांदणें इथें अश्रु ढाळितें

३

स्मरणांत कुणाच्या कुणीं शिल्प बांधिलें
ती बेगम सुंदर शहा न ते राहिले

सुखविलास त्यांचे फुलांपरी वाळले
शिळांत यापरि अमर भावना त्यांची निश्वासते
चांदणें इथें अश्रु ढाळितें

४

पुंडरीक मिटलें मूक उभा ' मुकबिरा '
हुंदका आर्त युगविरही हृदयांतला
या आरस्पानी शिलांतुनि उमटला
अमूर्तें न्हाउनि हृदय नभाचें गहिंवरतें दाटतें
चांदणें इथें अश्रु ढाळितें

५

निस्तब्ध शिल्प हें डोंगरास टेंकलें
विरहाच्या अंकीं प्रेम स्थिर झोंपलें
कीं जीवनस्वप्नचि मृत्युमनिं जागलें
स्मृतिविस्मृतिच्या सीमेवरि कीं कविता ही बोलतें
चांदणें इथें अश्रु ढाळितें

# भवानीशंकर श्री. पंडित

( नागपूर–अजनी )

## दोन कणसें

ज्वारीच्या धांड्यावर एका
        दोन परस्परविरुद्ध कणसें
एक उभें वर शेंड्यापाशीं
        दुजें लवे तर पायां-सरसें.
सहजासहजीं अगदीं जाई—
        बघतां बघतां लक्ष प्रथम वर,
कसें बरें तें जावें खालीं ?
        कारण बहुधा घाण अधस् थर !
थाटमाट वरच्याचा न्यारा
        वरतीं त्याची ताठर गर्दन,
डामडौल लव नच दुसऱ्याचा
        मान खालतीं–मानानें पण !
महत्प्रयासें हात लांबवुन
        वरच्याला ओढून कापलें
कण सांपडले त्यांत मोजके
        परी निघालीं खूप टरफलें !
लीलेनें मग हात वाकवुन
        खालच्यास अ-लगेंच तोडलें
दाण्यांनीं भरघोस फुगोनी
        फुटावया तें होतें आलें !

## पण्डित सप्रे

(कऱ्हाड)

### अश्रू

(मुक्तछंद)

———डोळ्यांतून तुझ्या
असा ऊन ऊन
पृथ्वीचा हा अश्रू—
ओघळावा—असें

कोणतें एवढें
जहाले रे! होतें
दुःख ईश्वरा!

### लोकांत कुठेंही—

—लोकांत कुठेंही खपे न तें कुणि त्यातें
नव्हतेंच लाभले सावज भोळें ऐसें;
म्हणुनीच काय तूं गांठुनिया आम्हांसी
बांधिलेंस अमुच्या गळ्यांत जीवन ऐसें!

———

# म न मो ह न

(पुणें)

## एकलव्य

एका प्रचंड ग्रंथशाळेचा पुतळा करून
मी एकलव्यासारखा ज्ञान मिळवूं लागलों.
ती भक्ति अजब होती
परंतु अखेर—
त्या पुतळ्यांतून—
तो पुतळा कडाडा फोडून
अनेक नारसिंह बाहेर पडले भुकेलेले.
त्यांचीं गालफडें बसलेलीं,
बुबुळें फिरलेलीं.
लिहितांना माझ्या कागदावर तीं नाचूं लागलीं
खुरटलेल्या अंगाच्या गोप-गोपींचा तो रास.
गाई होत्या आचळें नसलेल्या.
आणि मुरली—
मुरलीही होती. परंतु तिला पांच भोकें होतीं
माझ्या रंध्रारंध्रांना तीं सारीं टिपऱ्या मारूं लागलीं.
माझ्या मजकुरांतलीं अक्षरें ती बदलूं लागली.
माझी आजची कविता वाचणाऱ्या
रसिक वाचका !
हीं अक्षरें म्हणजे
त्या असंख्य पुतळ्यांच्या पावलांचे छाप.

---

# गं. ब. ग्रामोपाध्ये

( बेळगांव )

## डांबरी रस्ता

लाल कंदिल
पेंगत पेंगत राखण करी
' काम चालू रस्ता बंद ' पाटीची, पी.डब्ल्यू.डी.च्या !
शेजारीं उभें खडी दाबाचें
काळें एंजिन !
अजस्र यंत्राचें छोटेसें धूड !
दाबली गाडली कितीक ज्यानें
' थ्री फोर्थ ' खडी
डांबर कढत वरी ओतून !
आणखी उभी
रस्त्याच्या कडेनें
खडीच्या ढिगांची रांगच रांग !
डांबरपिपांच्या खड्या पाहऱ्यांत
तिष्ठत उद्याच्या मरणासाठीं !
( तिष्ठती जैसे रांग लाऊनी रेशन दुकानासमोर लोक
आजच्या उद्याच्या जीवनासाठीं ! )

स्थितप्रज्ञसें
पाहिलें ज्यांनीं
कितीक चेपले दाबले रोज
आप्तबांधव
डांबर मार्तींत स्टीमरोलनें—
नागरसंस्कृति पायघड्यांनीं जावी म्हणून !!
—डांबरी रस्ता
इस्त्री केलेला
आणि मधूनी अर्ध बोबडा
देत उसासे गाळीत आंसवें
गिळीत आंसवें
आंतल्या आंत !!
—आणि वरून
वरून दुरून
यामिनी सांगाती स्वप्नाळू चंद्र
पाहतो खालीं
आणि वर्षितो भूतदयेचें गुलाब पाणी !
जरी न शिरे तें
भाजल्या थिजल्या रस्त्याच्या मनीं !!

## गजानन दिगंबर माडगूळकर

( पुणें )

### नकोशी !

भूकंपांनीं खचलीं नगरें
आभाळानें मरण ओतलें
लोकशाहिच्या बादशहांनीं
घशांत दुबळे देश घातले.

स्वर्ग कोपला, धरा कोपली
प्रकोप उसळे वरती खालीं
पाताळाच्या पोटामधुनी
अजिंक्य ऐसी आग उसळली

अस्मानाच्या अवकृपेशीं
सुलतानांची चाले स्पर्धा
उभ्या जगांतिल अशक्त मानव
भडकित्यांतुन उडला अर्धा

अर्धवटांची उरली दुनिया
अर्धी सत्यें उगा घोकिते
भविष्यांतल्या स्वर्गसुखांनीं
हिडिस आजचा काळ झांकिते

सत्तांधांची नीतीमत्ता
रणभूमीवर फिरे नागवी
क्रूर भोग तें दृश्य पाहुंनी
मरतां मरतां तृषा भागवी

भोगहि मरतो, त्यागहि मरतो
कर्म सांगतें ' लढा गड्यांनो !'
चक्र-क्रमांतुन उठते वाणी
' रडा रड्यांनो, मरा मढ्यांनो ! '

मी निजल्यावर, जागी कविता
अशी बडबडे बसुन उशाशीं
या वेडांतिल गूढ कळेना
तीच वाटते नको-नकोशी !

---

## पद्मा [ सौ. पद्मावती गोळे ]

( पुणें )

### कितीकदां तरि—

कितीकदां मी रागवतें अन् रुसतें तुझियावर
मनांत म्हणतें तुझ्या नि माझ्यामधें किती अंतर

कितीकदां तरि कटु शब्दांनीं उपहासें बोलतें
भांडुनि तुजसी धरुनि अबोला दुःखाश्रू ढाळतें

कितीकदां तरि मतभेदांचे डोंगर मी निर्मितें
सोडुनि द्याया नाद तुझा हे कितीकदां ठरवितें

मी कवयित्री तुला समजतें मुलखाचा अरसिक
कशी आपुली जुळली प्रीती त्या प्रभुला ठाउक

कितीकदां तरि डोळे मिटुनी नवजीवन उभवितें
सखी कल्पनेसवें स्वैर मी एकांतीं नाचतें

शैल शिरावर मंदिर-भवती वनराई पाहतें
झुळझुळ वाहे निर्झर जवळीं ऋतुकामिनि हासते

नील जलाशयिं नौका माझीं हंसासम डोलते
जलदेवीसह नवसृष्टीच्या कवनीं मी रंगतें

निसर्गराणी साक्षात् मी, पण प्रश्न छळी सारखा
राजा कोठें रसज्ञ प्रेमळ जाणकार प्रियसखा ?

म्हणे कल्पना, ' सखे ! स्वयंवर पुन्हां आपुलें कर "
ओळखिचे मग कितीक चेहेरे येति पुढें भरभर

कितीकदां तरि परदेशींही हिंडुनि मन ये मम
आवडेल का गमे धाडसी गौरकाय प्रियतम

परी रुचेना एकहि हृदया दमतें मी धुंडुनी
भावनेस मग अखेर म्हणतें, " सांग कोण मन्मनीं "

घडवुनि मूर्ती म्हणे भावना " पहा तुझा प्रियकर
तव हृदयींचा अधिराजा हा सखे ! सुगुण सुंदर "

आणुनि कंठीं प्राण बघे मी मनःचक्षु उघडुनी
हंसत उभा रे ! तूंच मजपुढें निज बाहू पसरुनी !

# भालचंद्र खांडेकर

( पुणें )

## स्वप्नचिंतितों

स्वप्न चिंतितों पडल्या पडल्या
असतांना मम उघडे डोळे,
क्षणांत एका तिथल्या तेथें
पाण्यानें ते होती ओले.
आणि पापण्या केव्हां मिटतां
हसतों दिवसा स्वप्नीं रंगुन
——मीच विधाता या विश्वाचा;
कधी प्रभंजन, केव्हां रंजन !

## माझ्या गरीबींत—

दिनभर झिजे रोज
माझा देह कणकण
आणि सांज कलतांच
जड होतात लोचन.
दोन घास मिळवाया
नमवावा लागे माथा
घास हातीं येतां येतां
शीर्षीं बसतात लाथा.
शिणलेला देह जरा
टाकतांच भूमीवर
कानीं आदळतो माझ्या
भुकेल्या बाळाचा स्वर.
—पण तरीहि पाहतां
'घरीं' सानंद सायास
वाटे माझ्या गरीबींत
आहे जिणें जगायास.

## प द्मा लो कू र

( पुणें )

**गायिका—**

मी गान गातसे येथें रसिकांचा मेळा जमतो
रसिकराज माझा नाहीं, शरिरांत प्राण ना गमेता
उन्मेष फुलांचे बघुनी धांवून पांखरें आलीं
भृंगाची चाहुल नाहीं पुष्पता शून्यमय झाली
उभविलें यशोमन्दीर गगनास कळस हे भिडले
परमेश राउळीं नाहीं, पूजेस ध्येय ना उरलें
उलगडुनी पीळ हृदींचा गानांत सूर मी भरतें
उद्रेक होइ भावांचा नयनांतुन पाणी झरतें
जी अनुभविली प्रीतींत तीव्रता भावभंगाची
ती ओतुन करतें भरती मी गानाच्या कलशाची
पोंपावत जाते जेव्हां स्वरतान तीव्र उंचीला—
रसिकांचा सिन्धू जेव्हां येतसे पूर्ण भरतीला—
भग्नाश हृदय मम रडतें तत्क्षणीं आंतल्या आंत
वैफल्य आठवे मजला जे येत हाय ! हातांत
जें धन्योद्गार जगाचे मम कर्णपथावरि येती
मज अभाव तव जाणवतो मम कीर्त होत ना पुरती
सहवास तुझा जरि नाहीं तरि जीवन सुंदर केलें
परि सौख्य त्यामधें कोठें ! तें करुणरसानें भरलें
विरघळली प्रीतीस्वप्नें नैराश्य येइ पदरांत
नैराश्य थोर मज वाटे जें येत थोर प्रीतींत
ती थोर निराशा तुझिया वांट्यास मात्र ना येवो
यातना जाळि जी जित्रा, स्पर्शेंही तिचा ना होवो
रे ! अपुल्या प्रीतीसाठीं जळणार मीच गानांत
धगधगत्या अंगारानें ऐसेंच जळो मम गीत !

---

# वसंत वैद्य

## ( ठाणें )

### विषप्राशन

( क्रांतीच्या लाटेवर उडी घेतांना— )

चला या हांसत होउं पुढें
करूं कालकूटाचे पिउनी रिते समस्त घडे !

हालाहल नच ये चिरतृषितां
घेउन वार्तिक अमृतवार्ता
करुं जीवाचें कवाड आतां
स्वागतार्थ उघडे !

मानवता जप हृदीं चिरंतन
कंठांतच विष विसरे विषपण
ठावें आम्हां जहरामागुन
अमृतलाभ घडे !

आजवरी जें जीवनमंथन
करीत आलों मरणें जिंकुन
उज्वलता या महन् मृतींतुन
आज तयास चढे !

मरणारे मरतील विषानें
मृत्युंजय आम्ही न कशानें
नित्य मरूनहि अनंत मरणें
राहुं जिवंत खडे !

अखेरच्या या विषप्राशनें
असति व्हायचीं निर्विष भुवनें
सुधेचेंच मग देणेंघेणें
उमाप चोंहिकडे !

———

# अनंत पोतदार

## ( देवास-मध्य भारत )

### रात्र—

करिं कुंकुमकलश रम्य मिरवित ये स्वर्णकाय
अंध जगा दृष्टि देत ही पहाट थाट काय !
कळि खुलली वसुधेची जागृति ये सूर्यफुला
रसिक भृंग निघती हे शोधाया मुकुलकुला !

तिमिर प्रकाशांत विरे विश्वांतिल शांति सरे
सृष्टीच्या बंदिजना सहज भावगीत स्फुरे
जडतेचे अजड मेघ चैतन्यामधिं विरले
अवचित अन् आभासें प्रत्यक्षाला वरिलें !

—परि दिसतां किरण कुणी कोटरांत फडफडते
उदराच्यां चिंतेनें उडण्यास्तव धडपडते !
कुणि—सुटली गाढ मिठी हाय सरे मीलन तें !
मित्राचे कर बघून शेजेवर तडफडतें !

नीज पुरेशि न झाली म्हणुन कुणी श्रांतक्लांत
गत रजनी चन्देरी आठवींत क्रमत वाट
स्वप्नांतिल स्नेहल क्षण रातराणिचा सुगंध
बाळगुनी मीहि उरी टाकी पद मंद मंद

शिणलेल्या दमलेल्या विश्वाला घे कुशींत
स्वप्न सुधा पाजुनिया गाइ निशा मधुर गीत !
मावळुनी व्यापताप फुलति तदा भाव रुचिर
अननुभूत ये प्रचीति चगण्या जी देई धीर

—आवडो खुशाल उषा सूर्यफुला मुकुलकुला—
परि निगूढ शांत स्निग्ध आवडते रात्र मला !

## रा. ना. पवार

( सोलापूर )

### सार्थ होउं द्या माझं मरणें

हें कसलें माझें जगणें ?
मोतीं पिकवुन माती खातों
उरीं फुटेतों राबराबतों
जुनीं पुराणीं लक्तरेंच हीं माझी उंचीं आभरणें
चंद्रमौळि हा महाल माझा
नको मला संपर्क जगाचा
दुर्दैवाची पाखर मजवर, मला कशाचें काय उणें ?
दारिद्र्याचा खडा पहारा
घोर संकटें करिती मारा
जीवन येई सुखवाया मज, घेउनि रोगांचे नजराणे
ऐश्वर्याची स्वर्ग सुखाची
ताकद नाहीं इथें यायची
दारावरतीं प्रारब्धाचें भले थोरलें असें लोढणें !
कितिदां माझें साहस ढळलें
मृत्यु भयाच्या कुशींत दडले
वरकरणी मारिल्या बढाया आणुनिया उसनीं अवसानें !
जन्मभरी मी कांहिं न केलें
रडगाणें माझेंच गायिलें
स्वार्थी या जीवास कशाचें समाधान कोठून लाभणें !

समाधान अतृप्त राहिलें
जगलों तोंवर नाहिं मिळालें
निरोप तुमचा घेउन जाइन, तेव्हां माझें हेंच सांगणें !
" माझा आत्मा जाइल उडुनी
मागे पार्थिव देह ठेवुनी
नका करूं संस्कार ! होऊं द्या तें गिधाड-घारींचें जगणें
सरणावरतीं जगुनी मेलों ! सार्थ होउं द्या माझें मरणें !

---

## श्रीनिवास वि. खारकर

( पुणें )

### काका काका मला वाचवा—

काका काका मला वाचवा
आले गारदी त्यांस थांबवा ?
मिठी मारतों कमरेला मी
पाया पडतों पुन्हां पुन्हां मी
काय असे पण केलें हो मी ?
चूक जाहली काय दाखवा !
माधवदादा अखेरीसला
तुमच्यापाशीं काय बोलला
" नारायण ओटींत टाकला—
तुम्हीच याचे आईबाप व्हा. "
बोलत नाहीं कां हो काका ?
माया सारी विसरलात कां ?
काकी तूंही गप्प उभी कां ?
पोरावर कां राग धरावा ?

लोभ कशाचा इथला नाहीं
राज्य नको मज, नकोच कांहीं
तुम्हांस घ्या हो पेशवाइ ही
खड्गाचा पण वार आडवा......
पुण्यांतला तो विराट वाडा
अजुन थरकतो मधेच थोडा
कान जरा द्या बंद कवाडा
ऐकूं येइल करूण धांवा—
"काका काका मला वाचवा!"

## चन्द्राच्या होडींत–जाऊं ये जोडीत—

चन्द्राच्या होडींत, जाऊं ये जोडीत, ओलांडुन आकाशाला
कहाणी प्रीतीची, अपुल्या दोघांची, देवांना सांगायाला.
माणसांच्या ह्या–इथल्या जगांत–राज्य नाहीं हृदयाचें
हृदयाचें हृद्गत इथे ग कुणाला–कधि नाहीं कळायाचें
निर्दय निष्ठूर, असल्या जगांत, नको नको रहायाला!
गळ्यांतल्या काळ्या–मंगल सूत्रानें–इथें जीव ओवायाचें
सात पावलांत–सातही जन्माचें–इथें नातें जुळायाचें
असलें नातें हें, जोडायाची आजला, संधी नाहीं आपुल्याला!
आज ह्या जगांत–असेच आपण–दूर दूर रहायाचें
पुढल्या जन्मांत–पण गं आपण–होऊं एकमेकांचें
पुढल्या जन्माचें, असलें मंगल, मागणें हें मागायाला
चन्द्राच्या होडींत, जाऊ ये जोडीत, ओलांडुन आकाशाला!

# पी. सावळाराम [सावळाराम पाटील]

( ठाणें )

## कशाला जाऊं पंढरपुरीं ?

विठ्ठल रखुमाईपरी,
आईबाप हें दैवत माझें, असतां माझ्या घरीं
कशाला जाऊं मी पंढरपुरीं ॥ धृ ॥
कैलासाहुन थोर मन हें माझ्या बाबाचें
शंकराला विष न पचलें प्रपंच दुःखाचें
पचवुन देती अमृत मजला संत वचनांचें
पुंडलिकापरी हात जोडुनि सदैव सामोरी १
सात समिंदर भरूनि उरली माया आईची
प्रेमळतेला उपमा नाहीं, वाणी ज्ञानेशाची
मंगल शोभा जिच्या ललाटीं कोटी चंद्रांची
वत्सलमूर्ति माय माऊली मानस देव्हारीं २
विटेवरचे जगजेठी हे आले माझ्यासाठीं
संसाराचा थाट मांडुनी केली मजला मोठी
करपुष्पांची माला घालुन तुमच्या मी कंठीं
चरणांचे हें तीर्थ घेते चंद्रभागेपरी ३

# विहंग [ वि. के. देशपांडे ]

( कऱ्हाड )

## प्रीतीचा डाव

पहिल्या प्रीतीचा ग, मांडिला डाव जीवनांत
सखा आणि मी सखे, जाहलों जोडिदार त्यांत
'मी पण' माझें पणास लावुनि दान टाकियेलें–
दान अचानक उलटें पडलें 'मी-पण' मी हरलें
पुन्हां खेळलें पणास लावुनि मम सौंदर्याला–
अपयश आलें पदरीं माझ्या त्याही वेळेला
चिडुनि लाविलें हृदय पणाला टाकियलें दान
तेंही हरलें सखे, अखेरीं-झालें बेभान

डाव घेतला सखये, नंतर सखयानें हातीं–
विजयश्रीची धुंदी नयनीं चढलेली होती
पराक्रमाला प्रथम तयानें पणास लावियलें—
दान परंतू उलटें पडलें अघटित तें घडलें
पुन्हां खेळला पणास लावुनि अपुला अभिमान
तोही हरला पडलें हातुनि उलटें तें दान
चिडुनि अखेरीं हृदय तयानें पणास लावियलें
दान तयाला उलटें पडलें-त्यानें तें हरलें
जिंतही आम्हीं-जेते आम्हीं-विपरित ही रीत
विपरित सारा डाव खरोखर नांव जया प्रीत !

## सुधांशु [ ह. न. जोशी ]

( औदुंबर )

### मोहरतें मन

वळवाची सर सरसर सरसर
येते, जाते क्षणांत परतुन
लव भेटीनें परी तियेच्या
सृष्टीचें हिरवळतें जीवन
येतां जातां मार्गावरूनी
जरी तिचें हो पळभर दर्शन
ओझरत्या त्या नयन—सुखानें
उदास माझें मोहरतें मन !

---

## मधुकर कुलकर्णी

( पुणें )

### पहिलीकविता—

प्रतिभा माझी मूर्तिमंत ती
छेडित येते रुचिर, मधुर स्वर
शब्दब्रह्म साकार बैसते
कविहृदयाच्या कमलदलावर !
ज्वालामुखि मम हृदयिं भडकतो
दास्य, दैन्य अन् दुःख पाहुनी
नेत्रमुखांतुन येत उफाळुन
शब्दब्रह्म तें लाव्हा बनुनी !
रक्ताश्रूंची का ही सरिता ?
छे ! मानवतेची पहिली कविता !

---

# गो विन्द स्वा मी आ फ ळे

## ( पुणें )

### या चला माझ्याच मार्गे—

या चला माझ्याच मार्गे; चाललों मी हा पुढें
थांबता कां पाहुनीया ऊष्ण रक्ताचे सडे !

तें तिथें मंदीर आहे यज्ञ आहे पेटला
चालला जयघोष मोठा मोक्ष मंत्रांचा भला
स्थापियेली चंडिका ती उग्र देवी मंगला
भक्त ते त्यागी विरागी सोहळा जो रंगला
आहुती द्याया स्वतःची चालले ते फांकडे

"दाटला अंधार मार्गी बैसताती ठोकरा
ये निराशा, खोल आशा, धीर राहीना जरा"
हें असें बोलूं नका रे, पुत्र शूराचा खरा
मारितो, मरतो स्वतःही घेइना मागें जरा
टाकिलें पाऊल पुढती काय तें कोठें अडे ?

पूर्वजानीं पेटविलें कुंड तें थंडावलें
वंशजानों ! जागृती घ्या हें नसें रे चांगलें
उमगलें आतां मला, मी चाललों कुंडाकडे
आहुती देतों स्वतःची कुंड ज्यानें धडधडे
व्याघ्र बच्चे वाघ असती, श्वान नाहीं बापुडें !

---

## वसंत प. केतकर

( मुंबई )

### निराशा शूराच्या—

जरी कारागारीं खितपत पडे चोर शतदां
तरी वेगें चोऱ्या शतपट करी, खून कितिदां !
अवीं हस्तें त्याच्या कृति कशि घडे कारण तरी
‘ निराशा शूराच्या कधिंहि हृदया स्पर्श न करी ! ’

कुणी वेडा प्रेमी प्रियसखिस्तवें नित्य झुरतो
कधीं कोणा स्त्रीच्या कडुन जरि त्या बूट मिळतो !
सदा मागें तीच्या उगिच विनवी जाउनि तरी
निराशा शूराच्या कधिंहि हृदया स्पर्श न करी !

कवींच्या काव्याला कुणि न पुसतो श्वानहि जरी
तशा येती मागें सकल कविता सादर जरी !
अशा कैफामध्यें कवि करित काव्यें कितितरी
निराशा शूराच्या कधिंहि हृदया स्पर्श न करी !

जरी लाखों वेळां अडखळुनि मार्गीत पडला
गटारीं झिंगूनी जरि सतत पंकांत बुडला !
खरा दारूडा तो करित मदिरापानहि तरी
निराशा शूराच्या कधिंहि हृदया स्पर्श न करी !

# राजकवि गोविंद झोकरकर

## ( देवास )

[ टीपः—चाल-गझल-संमिश्र. यतींचा क्रम संगीतानुकूल ठेवला आहे. ]

### "मृणालिनीचें मनोगत !"

प्रेम केलें हो ! जगीं कां ? हा गुन्हा झालाच माझा ?
प्रेम केलें हो ! जगीं कां ? हा गुन्हा झालाच त्यांचा ?
बोललें नी भेटलें मी, कां गुन्हा झालाच माझा ?
तेहि आले भेटण्या, कां हा गुन्हा झालाच त्यांचा ?
मनांत आस अती भेटिची किती होती
परंतु लोकदृष्टिची मला भिती होती
तिथें अचानक ती भेटता परी मूर्ति
उचंबळोनि तदा ये अहो हृदीं प्रीति,
जवळि गेले मी तयांच्या, कां गुन्हा झालाच माझा ?
जवळि आले तेहि माझ्या, कां गुन्हा झालाच त्यांचा !
सकाळ गोड किती होति त्या रवीवारीं
असेल शुद्धि नि येईल ही तिथें 'स्वारी'
पडेच बोलफुला गांठ नी दिसे 'स्वारी'
वळेंच दृष्टि तदां, मी अशी उभी दारीं,
पाहतां त्यांनींच मजला, ऊर ये, भरूनीच माझा !
कंठ सुकला, नेत्र ओलें, आणि अडली ओठिं वाचा !
प्रफुल्ल मानस मम जाहले अती हर्षे
मनोज्ञ दृष्टिपुढें येती ती जुनीं दृश्यें

पटेल ओळख कां ? जाहली किती वर्षे !
मनांत हुर्हुर ही, दाटली स्मृति-स्पर्शे.
तोंच दिसला, नयनिं मजला, प्रीतिचा संदेश त्यांच्या !
प्रीत जाणे मूकभाषा, प्रीत जाणे प्रीत वाचा !
करूनि धीर बहू मी हळूं पुढें झाले
प्रणाम नम्र करोनी समीप मी गेले
बघून मत्कृति तेही, समीप हो आले
प्रतीक प्रीति बघोनीच तोषले डोळें
"काय केव्हां ? येथ आला ?" प्रश्न साधा हा तयांचा !
मी "बरें नाहीं जिवाला," उत्तरीं, कथिले तयांच्या !
इथेंच संपलि ती देवघेव शब्दांची,
परंतु तृप्ति न तैं, जाहलीच भेटीची,
तनूस उत्सुकता भासलीच स्पर्शाची,
कशी कळे न मला, शुद्धि गेलि हो माझी,
पुष्प वेणींतून दिधलें, मी करीं तात्काळ त्यांच्या !
स्पर्श नोहें तीर गेला, भेदुनी जीवास माझ्या !
कृतज्ञता नयनीं दावुनीच ते गेले,
असें क्षणांत अहो 'स्वप्न'गोड, तें सरलें
समाज भोवतिचा पाहतां मनीं भ्याले
घडे न पूर्वि कधीं, आज कां असें झालें ?
हाय ! वार्ता ! दूर जाई ! पेटला वणवा, सभोतीं ! !
चालली गावांत चर्चाः—"ही अनीति ! ही अनीति ! ! "
साहते ही लोकनिंदा, घालुनीया मान खालीं ! !
प्रीति निर्मोनीच देवा ! तूंच कां केली कुचाळी ? ?

# शंकर वि. वैद्य

( पुणें )

## स्वर्गाच्या सीमेवर !

तारकांच्या प्रकाशांत
चन्द्र घाली नभीं गस्त,
अंधाराच्या पापणींत
झालें विश्व समाधिस्थ !
झुळुझुळू रांगणाऱ्या
पवनाच्या लाटांवर
रातराणीचा ये गंध
उन्मादक मनोहर !
कुजबुजतात पानें
डोलणाऱ्या तरुंवर
हालतात सांवल्याहि
मागें पुढें दूरवर !

समोरच्या सरोवरीं
मण्डूकाचें गान चालें
खिदळत अवखळ
लाट मधूनीच बोले !
सरोवरीं डोकावतें
आकाश हें वरतून
लुकलुकणारे डोळे
घेती रूप न्याहाळून
सांग सखे ! किती वेळ
येथें असें बसायचें ?
युग संपेल, न तरी
समाधान व्हावयाचें !

युग संपेल, न तरी
समाधान व्हावयाचें
क्षणोक्षणीं आकर्षण
असेंच हें वाढायचें !
गुलाबाच्या कलिकांनीं
अंतरंग खुलें केलें
लुटारू या पवनानें
त्यांचें धन लांबविलें !
दरवळे चाफयाचा हा
उन्मादक गोड गंध
त्याच्या सेवनानें झालें
सारें उद्यान हें धुंद !
बहरलें, मोहरलें
जाईजुईचेंहि अंग
चन्द्र बघे उकलुनी
सुमनांचें अंतरंग !
चहाटळ चन्द्रमा हा
झाला याच्यांतच दंग
त्याचें तेज चुंबीतसें
सारी बाग सांगोपांग !
सांग सखे ! किती वेळ
येथ असें बसायचें
युग संपेल, न तरी
समाधान व्हावयाचें !

युग संपेल, न तरी समाधान व्हावयाचें !
क्षणोक्षणीं विसरून भान येथें जावयाचें !
मृदु पाय टाकूनीया सुकुमार सुमांवर
स्वर्गीतल्या पऱ्या येथें खेळतात रात्रभर !
भूमीवर पडतांच त्यांचे दिव्य तेजःकण
ठेवितात काजवे ते निज ऊरीं सांठवून !
पऱ्यांच्या त्या पखांतलीं गळतांच पिसें खालीं
त्याच्यांतल्या तंतूनीच कोळी बांधीतात जाळीं
चन्द्र-किरणाच्या रम्य बसूनीया झोक्यांवर
आणतात उल्कांनाहि तोडून त्या भूमीवर !
सांग सखे ! किती वेळ येथ असें बसायचें ?
युग संपेल, न तरी समाधान व्हावयाचें !

युग संपलें, न तरी समाधान व्हावयाचें !
शतजन्म घेऊनाहि अपुरें तें राहायचें !
आणि त्याच्यातच सखे ! असतां तूं संगतींत
घडोघडी आकर्षण व्हायचेंच द्विगुणित !
लाल ओठांतली धुंदी यायची न वीट तिचा
वाढायाचा हव्यास तो मिठीतल्या एकतेचा !
परी सुखा लागताच शींग, दुःख-भाग येई
म्हणूनी या सुखाला न शींग मुळीं लागू देई !
सुखांतली गोडी नेते संपूर्णता हिरावून
अपूर्णता परी ठेवी तीच गोडी टिकवून !
म्हणूनीच सांग सखे ! असें किती बसायचें ?
स्वर्गाहुनी सीमेवर खरें आकर्षण त्याचें !

# कु. सुधा पटवर्धन

( पुणें )

## होतों लहान आपण

होतों लहान आपण
होते दिवस सोन्याचे
दिनभर खेळण्याचे
निष्पाप ते १

होतों लहान आपण
होते दिवस मायेचे
मधु शब्द माउलींचे
ऐकण्याचे ... २

होतों लहान आपण
होतों भांडत प्रेमानें
होतों रुसत लाडानें
खोटें खोटें ३

होतों लहान आपण
होतों आईच्या शिरत—
रात्रीं हळूंच कुशीत
एकोप्यानें ४

होतों लहान आपण
बागडत सर्व काळ
धाक तातांचा प्रेमळ
भय ज्यांचें ५

पण गेले ते दिवस
कोणासाठीं न थांबतां
नाहीं आई, नाहीं ताता
कुणी आज ६

आज गेले ते दिवस
आणि राहिलों एकले
जग निष्प्रेम वाटलें
भाऊराया ७

पण जाणार तूं आतां
तुझा मार्ग फुलवाया
भवितव्य उजळाया
दूर दूर ८

आज येतात दाटून
कंठ दुःखाचे अपार
एकली मी रहाणार
कशी आतां ? ९

शिकवीसी व्हाया धीट
परि नुरली ताकत
माझ्या हळव्या मनांत
सोसण्याची १०

दाखवीसी वर वर
मुखावर कसें हांसु
दडलेत परि आसु
नेत्रांमागें ११

भाऊ तातांची पुण्याई
आत्मा आईचा प्रेमळ
आतां करील सांभाळ
तुझा-माझा १२

## प्र भा क र भ. बि ड वे

( पुणें )

### दुर्बलांनो !

लाख चक्रांच्या गराड्यामधून
तुमचें जीवन गिरक्या घेत
चाललें असें हें चक्या समान
फिरत फिरत स्वतःभोंवतीं
निघाल्या ठिकाणीं परतुन येत.
कामकऱ्यांनो,
घामाचें तुमच्या तेल तयांना
पाजितां सदाच प्रगतीसाठीं पुढें जावया
सुखासमाधानें जीवनरणांत
जगण्यासाठीं.
—परंतु तुमचा आहेत करीत पाठलाग इथें
मस्तवाल घोडी कुबेर पुत्रांची
( चौखूर पायांनीं ).
रसहीन तुम्ही उसाच्या चोयट्या
तरीही पिळीत रस काढाया
उरला सुरला तुमच्या हाडांत.
कामकऱ्यांनो,
असे हे तुम्ही, रसाचे बुधले
घेऊन ओतून ठेवती पालथे.
आणखी वर—

म्हणती तुम्हांला ‘ दुर्बल दुर्बल.’
—आणि तुम्हीही सरावला आतां
म्हणवून घ्याया दुर्बल स्वतःला.
परी तुमच्या दुर्बलतेंत सांठली आहे
साऱ्या दुर्बलांची सर्व सबलता.
आणि दुर्बलांनो,
तुम्ही कां दुर्बल ? कोण म्हणील तुम्हांला दुर्बल ?
सुप्त तुमच्यांत आहे वसलेली
प्रचड शक्ति जग घडविण्या
मानवतेचें !
आजचा कुबेर कराल कंगाल
बघतां बघतां एका क्षणांत
धुळीनें माखलें जयाचें कातडें
कैक दिसांचें भुकेलें आतडें
त्याचीच पूजा बांधाल तुम्ही
आणिक त्यालाच कराल बहाल जीवन सारें
दुर्बलांनो तुम्ही—
धात्र्या आजच्या जगांत आहांत—
सम्राट बळाचे !
राज्य निर्माया शांति समतेचें ! !

# म नो ह र स र प ट वा र

वणी ( वऱ्हाड )

## वागायचें असेंच होतें !

वागायाचें असेंच होतें
वागलीस तर तशी कशाला
मारायचें असेंच होतें
दिधलें जीवन तसें कशाला ?
करावयाची अशीच होती
तुला निराशा माझी अंतीं
हृदयीं माझ्या पाउल ठेवुन
तशी तेवविलि कशास ज्योति ?

ज्योतींतच मी विलीन व्हावें
असें तुझ्या कां मनांत होतें ?
लोचनात मग दाविलीस कां
खोटी प्रीति भावहि खोटे ?
कुजबुज केली तशी कशाला
असें व्हायचें होतें निष्ठुर
कशास केलें तसें जवळ मज
झिडकारुनिया द्यायाचें जर ?

अथवा हेंही लटिके सारे
अशी मुग्ध कां झणीं बोल ना
' असें ' वागणें रुसवा म्हणुनी
' तशीच ' करशिल प्रीतियाचना !

# वा. ज्यो. देशपांडे

( जुन्नर )

## कां ग ध्वजे फडफड ?

कां ग ध्वजे फडफड ? काय तुझीया पोटांत,
सांग संकोच सोडून, नको ठेवूस ओठांत.
खरें स्वातंत्र्याचें वारें वाहती ना भारतांत ?
स्वप्नें साकार झालीं कां पाहिलीं जीं दिनरात ?
हिमालया पासूनिया दक्षिणेला रामेश्वरीं,
सुखी आहेत ना बाळें आपुलिया घरोघरीं ?
इथें उच हवेलींत रोषणाई दिसो आली,
श्रमिकांच्या कुटीमाजीं आहे दिवली तेवली ?
देहमन रक्ताळलें आणि व्याकूळले डोळे,
पांथ आले घरां त्यांना ओलें सुकें काय दिलें ?
दिनभर खपतांना पोट जाहलें भकाळी,
काय त्यांचा दुवा आला ? काय पोटाग निवाली ?
सांग संकोच सोडून काय ओठीं थरथरे ?
तुला पाहून आकांक्षा रोमरोमांत संचरे.
सवें आलीस घेऊन स्वातंत्र्याचा हा आहेर,
मग शांतिसमाधान कसें राहियलें दूर ?
आम्हां हिंपुटी जीवाला एक तुझाच आधार,
काय आणि मागतांना तुला वाटताहे भार ?
घरोघरीं आतुरलें वाट तुझी पाहतात,
जा जा सानंद मुखानें पुरवाया त्यांचे हेत.

## त्र्यंबक वसेकर

( अंबाजोगाई )

**अकालींच कोमेजल्या—**

मस्त झालेल्या सागरीं
उफाळत चाले नाव
शुष्क झालेल्या अरण्यीं
स्वैर वणव्याची धाव

भानुप्रकाश अंबरीं
चंद्र घाली येरझारा
सुप्त भूमीच्या उदरीं
तप्त लाव्हाचा फवारा

जल घातल्या अंगणीं
पारिजातकाचा सडा
वाळवंटाच्या प्रांगणीं
पाणियाचा तुटवडा

आलंगित वल्लरींना
घे ग पोरी घे ग नांव
अकालींच कोमेजल्या
वक्षीं कुठारीचे घाव

# सौ. उषा लिमये

( नागपूर )

## लुटुनीया सोनें आतां—

अंधाराचें अधिराज्य
सभोंवर पसरलें
तुला पाहण्या दारांत
मन माझें अधीरलें—१
विजयाचा वारस तूं
जिंकशील सारें जग
माझ्या मंगल आकांक्षा
सदा तुझ्या पाठीमागं—२
लुटुनीया सोनें आतां
येशील तूं क्षणार्धीत
आणि ओवाळीन तुला
माझ्या नयनांचे दीप—३
जरी असलास माझ्या
वहिनीचा प्राणसखा
परी आहेस हक्काचा
भाऊ माझा पाठीराखा—४
घाल तबकांत माझ्या
सोनियाची ओवाळणी
रागावणार नाहीं ना—
भाऊराया तुझी राणी !—५

# सौ. उषा लिमये

( नागपूर )

## समाधान

जन्मा येउनिया अफाट जगती मी काय केलें असे
शाळा, जेवण, झोप याहुनि मला उद्योग कांहीं नसें
माझे मित्र कुणी शिकूनहि पुढें झालेत कीं डॉक्टर
होती उत्तमसे वकीलहि कुणी साधाच मी मास्तर

टीकाकार कुणी, कवीहि बनती सन्मान त्यांना मिळे
कोणी लेखक ते प्रसिद्ध असती कादंबऱ्यांच्यामुळें
सैन्यामाजि शिरूनिया कितिक ते श्रीमंत झाले तरी
रात्रीं मी बसतों तपाशित वह्या अन् पेपरातें घरीं

विद्या अर्पण मी मुलां करितसे शाळेमधें जाउनी
आहे वेतन तें कमी, चिडतसे पत्नी म्हणोनी मनीं
होतों खिन्न परी विचार मनिं ये विद्यार्थि माझे जनीं
कोणी मंत्रिपदा विभूषिति तसे शास्त्रज्ञ होती कुणी

पाहूनी कळसाकडे जग म्हणो त्या गौरवोनी भले
राहूं आम्हि सुखी जरीही असलों पाषाण पायांतले

# मा. ग. पातकर

( कोल्हापूर )

## मनीषा—

कशास देवा जन्म घातला अबला मी दीन
मृत्यु न येई म्हणुनी जगतें जीवन हें हीन

उष्ण श्वास किति अतृप्तांचे भिडले या ओठीं
करपुन गेली त्या श्वासांनीं रसरशीत कांती

वक्षावर या किती खेळले कामुकसे हात
नाहीं भिडले कधींच तेथें पण चिमणे ओठ

कोण कुणावर फिदा न येथें वरवरचा आदा
पैसा करतो माणुसकीचा नित्य इथे सौदा

माना वळवुन डोळे मुरडुन कशास रे, बघतां।
शरीर थकलें मनही मेलें उरला हा चोथा

मनावांचुनी मानव इथले अर्थावांचुन शब्द।
नकोस देवा देउ कुणाला असलें प्रारब्ध ॥

एका शब्दासाठिं दयेच्या झुरते जन्मभरी।
मरतां देवा अश्रू यावे तुझिया नेत्रीं तरी ॥

———

# 'अकिंचन' [वासुदेव गणेश मेहेंदळे]

(पुणें)

## काय तरी हो करूं?

काय तरी हो करूं?...
घसरतों, तोल कसा सांवरूं?
मी दुर्बळ पुरता स्खलनशील पामरऽ!
हरघडी चळे मन, घालुं किती आवरऽ?
सोसुनी वार अति तनु होई जर्जरऽ!
कोसळतो हा तरूऽ!
कुठवरी अल्पबलें त्या धरूंऽ? १
बेफाम धावती अश्व उतरणीवरी!
ही गाडी खाई हिसके खालींवरीं,
बल सरे भराभर, नुरं धैर्य अंतरीं!
उच्छृंखल पाखरूंऽ!
कसें या मूर्खमना आवरूंऽ? २
अज्ञान, एकदां चुकलों मी नकळतऽ,
दुर्दैवें तेथें राखियलीं पाळतऽ!
तेणेंचि आज हा सूड निघे निश्चितऽ।
धीर कुठवरी धरूं?
कसें तरि स्वतांस मी उद्धरूं? ३
...चुकल्या बाळा क्षमा करी माउली!
सन्मार्ग दाउनी नेई उंचस्थलीं!
कुणि अशी मजवरी करील का साउलीं?
चरण कुणाचे धरूं?
कुणाच्या कुशींत सांगा शिरूं? ४

# शरच्चन्द्र चिरमुले

( सातारा )

## चिन्तनिका

प्रगती ही काय असे ? मानव जो करि दानव,
बुद्धीचें काय न हें व्यर्थचि वर्धित वैभव ?
"मानव हो वन्य पुन्हां; आचर जीवन मंगल."
—कोण तदा वरदा प्रभुसृष्टीला उपभोगिल ?

* * *

कैक युगें झालीं जन्मूनि जरी ही अवनी
सम्पादित देवत्व न सोडिति हे सुर अजुनी.
लोकशाहि कालांतिल काय न हा स्वार्थ घोर ?
सुरहो, ओढून तुम्हाला नर होईल अमर.

* * *

कवि चिन्तनशील असे, जग म्हणते हा उदास
करि मन्थन हृदयाचें, स्फुटत्राटक लेखनास
चिन्तनांत धुन्द मजा, लेखनांत तो न खास
सुखकर हो प्रसुतीहुनि कवितेचा गर्भवास.

* * *

गूढभाव मुक्तछन्द स्वरमाला भैरवींत—
छेडुनिया काल गात नवरस मधुरंगयुक्त
मरणचरण ये अखेर, हृदयंगम होय अन्त
जीवित ईश्वरविरचित रम्य गीत मूर्तिमन्त.

# गणेश पाठक

( नागपूर )

## कळ्यांचें निर्वाण

मृदुल फुलांच्या कळ्या पाहुनी
आशेला मनिं फुटे पालवी
उन्मीलन जैं होइल यांचें
दिशांदिशांतुन भरेल सौरभ १
नयन मनोहर रम्य विलसितें-
दिव्यशक्तिचीं, निर्मितींत या
रंग धाटणी किती कलात्मक
अबोध भासे सारी करणी २
मुग्धा कलिका करिति बोलक्या
वायूच्या हळुवार फुंकरी
आमोदाचें वैभवशाली
दालन खुललें प्रशान्त सोज्वल ३
घडिचें वैभव, घडिभर सौरभ
घडिचें जीवन, सारें घडिभर
नेणीवेंतुनी कालतिमिर ये
निर्माल्याचे ढीग चहुकडे ४
उघड्या डोळीं बघे वल्लरी
जित्राशिवाचा खेळ अहर्निश
नाविन्याच्या नव आशेनें
प्रसवतेच ती मुग्ध मधुकळ्या ५
गतावरी जे अश्रु ढाळले
तर्पणरूपें चिरशान्तिस्तव—
—मोल उद्याच्या नवोदितांचें
पुनर्नाश अन् पुनर्निर्मिती ! ६

---

# शरद कुलकर्णी

( कोल्हापूर )

## हातांत हात हे—

तूं जातां निघुनी
धरतीवरती उठल्या
चरणांच्या प्रतिमा
हृदयावरतीं ठसल्या

कुसुमांच्या ओंजळि
अर्पुनि त्या प्रतिमेला
दिधलें हृदिं आसन
प्रीत वाहिली तुजला १

तूं जातां परतुनि
सारंगीतुनि उठले
रव ते सादशसे
हृद्शब्दांशीं ठरले

त्या दोन रवांतुन
विरह भावना विणली
गीतें प्रणयाचीं
अधरावरती रुळलीं २

नयनांत बिंबली
प्रीती तूं ओळखली

मांगल्य अतां ती
या मगल क्षणिं ल्याली

हातांत हात हे
जीव जीवनीं धरुनी
संसारीं जाइन
तुझ्यासवें मी तरुनी ३

---

## म. स. घोलप

( पुणें )

### जीवन कीं विडंबन ?

जीवन ? छे ! हें जीवन कसलें !
कुत्तरड्याची ही जिनगानी
तुकड्यासाठीं मान तुकविणें
दुःख आणि अपमान गिळोनी

सोन्या-नाण्यांच्या नादावर
पदन्यास करि जग व्यवहारी
हृदय-शून्य हीं जिवंत यंत्रें
त्या नादावर फिरतीं सारीं

माणुसकीचा लेश न तेथें
धडाडती स्वार्थाच्या ज्वाळा
कृत्रिमता दिसतसे चहुकडे
'ममत्व' नुरलें वा न जिव्हाळा

शोषिति मानव, रक्त मानवी
हेवा, दावा या जळवांनीं
फोकितात अन् जिवंत प्रेतें
आपत्तींच्या भक्ष्यस्थानीं

जितेपणीं नित मरण दाविणें
प्रज्ञावंतांची ही करणी
बरीं न याहुन काय श्वापदें
मारितात जी एका मरणीं ?

द्वेष-मत्सरादिक भूतांनीं
पछाडिलें आजच्या मानवा
'शब्दाची' ना चाड तयाला
शब्द मुळी 'विश्वास' हा नवा
खांदेकरि ना चार लाभतां
प्रेत स्मशानीं न्याया उचलुन
नगदी 'नारायणा' वांचुनी
राही अंत्यविधी खोळंबुन
माणुसकीला मुकला मानव
जीवनांत ना स्वास्थ्य, शांतता
अधिभौतिक मानवी मनाची
पहा केवढी ही प्रगल्भता!
लांगुल-चालन 'अर्था'साठीं
काम-पूर्तिस्तव प्रीति-प्रदर्शन
हीच आमुची ध्येय-पूर्ति अन्
हेंच आमुचें समष्टि-जीवन!!
येथें हिणकस, प्रामाणिकता
अवसर नाहीं भूत-दयेला
पाप-पुण्य वा नीति अनीती
या शब्दांना अर्थ न उरला
नित्य परन्तू वातावरणीं
राळ उडतसें या शब्दांची
लौकिक मोठेपण मिळवाया
धडपड ही बेगडी जगाची
काय म्हणावें याला जीवन
हें नच जीवन! परी विडंबन!!

---

# बाळ कारंजकर

( सातारा )

## " बाळा जो जो अंगाई "

बाळा जो जो अंगाई
नीज कीं रे राजा लवलाही
हात सोनुले तशिंच पाउलें
अवयव तव हे खेळुनि थकले
डोळे मिटुनि घेई, जो जो अंगाई १

भिंतीच्या घरट्यांत चिमणीचें बाळ
गवताच्या काड्यांत झोपलें असेल
आईच्या पंखांत ऊबारा घेई, जो जो अंगाई २

पाळण्यांत आहेस आईचें बाळ
दाराच्याबाहेर लोकांचा काळ
स्वातंत्र्य संग्रामीं देशाचें बळ, जो जो अंगाई ३

दोरी पाळण्याची आईच्या हातांत
उद्धार देशाचा आईच्या हातांत
झोके देऊनी बाळास गाई, जो जो अंगाई ४

# वसन्त पिटके

## ( कोल्हापूर )

### मेघालोके—

ग्रीष्माचे ते सरले दिन परि
अंगाची हो अजुनी लाही
आशेनें मी नित वरि पाही
परी मेघ ना दिसे कुठेंही !

—आणि अचानक कुठुनी जमले
श्यामल काळे मेघ अंबरीं
पाउस-वारा गार वाहुनी
धूळ उडे अन् वातावरणीं !

वातावरणं नि जसें बदललें
हृदया माझ्या काय जहालें
येई अवचित स्मृति कसली ती ?
तनु रोमांचित कां ही होई ?
लागे हुरहुर केंवि अंतरीं
'मेघालोके...' आणि मुखांतरिं ?

मेघ बघुनियां झाला विचलित
यक्षचि ना तो ? विरही यक्षच !
यक्षापरि त्या आज मलाही
विरहानल तो आणि पोळतो !

## रा म कु मा र

( बेळगांव )

### स्वप्नावर मी केवळ जगतों

—आज कधीं मी मध्यनिशेला
काळोखाच्या मखमालीवर
तुझ्या प्रीतिचीं, तुझ्या स्मृतीचीं
रेखित बसतों स्वप्नें सुंदर !

पहिल्या भेटींमधलें सखि तें
मुग्धपणाचें लाज लाजणें
अंतरांतलें भाव वदाविण्यां
शब्द न ओठावरी उमलणें !

जिवाजिवांची ओळख पटतां
रात्र न सरली बोलबोलुनी
जगा विसरलों हंसतां हसतां
गालावरती गाल विसावुनि !

कधिं पुनवेच्या फुलल्या रात्रीं
चंद्रावरतीं नजर रोखुनी
हृत्तंतूंनीं बद्ध जाहलों
तव अधरावर अधर जडवुनी !

एक दिनीं परि अवचित् सखये,
हृदय विणेची तुटली तार
आणि पाहिलें तुला...तुला मी
फुलवित असतां परक्याचें घर !

—आणि इथें मी रात्रंदिन सखि;
कलंदरापरि स्वैर भटकतों
तुझ्या प्रीतिच्या तुझ्या स्मृतीच्या
स्वप्नांवर मी केवळ जगतों !

---

# विनायक देवरुखकर

( पुणें )

## " कोकिळेस "

गाउं नको मधुबोल ! कोकिळे ॥ धृ. ॥

आनंदानें नटलीं भुवनें,
उदास माझीं परी दालनें,
प्रसन्नतेचीं विरलीं गानें
आशा सारी फोल १

जीवनांतली तहान मोठी,
निष्प्रेमाची कोरड ओठीं,
व्याकुळल्या गे जीवासाठीं,
प्रेमाची ना ओल २

अवेळ रजनी गाशिल बाई,
रुचेल कोणा ती अंगाई,
मला नावडे तव नवलाई,
नुरे कशाचा मेळ ३

तव कंठांतिल गोड सुरांनीं,
फिरतो वारा रानोरानीं,
बेसुरता भरते मम कानीं
थांबिव ते मधु बोल ४

असेल कांहीं जर गायाचें,
गाणें गा भरल्या दुःखाचें,
विषण्णतेचें, हताशतेचें,
गमेल मज बिनमोल ५

## दत्ता डावजेकर

( पुणें )

**" भोळी प्रीत "**

भोळी माझी प्रीती आसावली
तुजसाठीं रे मोहना आसावली ॥ धृ. ॥
पाहूं कुठें धुंडुं कुठें
तटतट मनबंध तुटे
जीवाचा तोल सुटे बाई
परि धांवे तंव मागें ही सांवली ॥ १ ॥
रविराजा तुज सर्व दिसे
वद कोठें मम जीव असे
रात्र रात्र वणवण फिरलें
तारकांनीं मजसि पाहिलें
ना परि तें हृदय भेटलें
वेड्या जीवा ओढ तुवां कां लावली ?

---

## रा. स. देशपांडे

( अंबाजोगाई )

**कांहीं अभंग—**

आकाशीं अनंत
असतीं नक्षत्रं
दोन माझे नेत्र
गणतील १

अथांग भरलें
सागरांत जळ
माझी ही ओंजळ
उमापील २

भूमीचा विस्तार
असो अमर्याद
माझें अल्प पद
आक्रमील ३

मेरूच्या समान
असोत पर्वत
होतील कर्वत
करांगुल ४

पाषाण तो काय
वज्रही कठीण
करील संचूर्ण
स्पर्श माझा ५

अशक्य तें काय
मजसी कराया
करीन लीलया
दुष्कर जें ६

मज नको कांहीं
साहाय्य; साधन
कणखर मन
एक पुरें ७

* * *

भूमीवरी बळें
लाथ एक हाण
गंगा वर आण
पाताळींची ८

सागरांत दृढ
घाल तुझा कर
काढ रत्नाकर
मंथोनिया ९

अंगुलीनें नभा
भेदुनी निर्धारा
लाव खालीं धारा
अमृताची १०

घडीभर ठेव
अविचल दृष्टी
आणि कर सृष्टी
अन्नपूर्णा ११

दिव्य तुझें तेज
प्रकटवी सुप्त
कर हें प्रदीप्त
विश्व सारें १२

उघड आपुली
झांकलेली मुष्टी
हृष्ट करी कष्टी
जगास या १३

पाहून अद्भुत
चमत्कार नव
करील मानव
जय घोष १४

# सुरेश शर्मा

## ( मालवण )

### रूढींवर चढवा हल्ला !

सीमोल्लंघन करण्याला । रूढींवर चढवा हल्ला ! ॥ धृ. ॥
इतिहास ठाउका कोणा । रूढींच्या उत्पत्तीचा ?
पूर्वजांपासुनी आल्या । कां शुष्क वाद शब्दांचा ? ॥
गूढार्थ तुम्हाला नकळे । शिणवितां कशाला वाचा ? ॥
किति पिढ्या आमुच्या गेल्या ! ।
क्षितिजावरि नूतन आल्या ! ।
अस्तंगत त्याही झाल्या ! ।
सद्विचार देई सल्ला । रूढींवर चढवा हल्ला ! ॥ १ ॥
सोन्याचा पंजर म्हणुनी । कां आम्ही आंत शिरावें ? ॥
वडिलांचा कूप म्हणोनी । कां खारें पाणी प्यावें ? ॥
मोहवी मनातें म्हणुनी । सर्पास गळां बांधावें ? ॥
कनकाचा पंजर मोडा ।
कूप तुम्ही खोदा गोडा ।
तत्क्षणीं भुजंगा झोडा ।
जळवांनीं दुबळे बनलां । रूढींवर चढवा हल्ला ! ॥ २ ॥
आकाशीं तुटतां तारा । बसवील पुन्हा नभिं कोण ? ॥
मावळूं नको तूं ऐसें । सांगेल रवीतें कोण ? ॥
कोमेजुनि गेल्या पुष्पा । उत्फुल्ल करी मग कोण ? ॥
हाले सामाजिक नौका ।
रूढींचा लागे धक्का ।
बैसेल बुडाल्या फटका ।
ध्यानीं घ्या या कवि-बोला । रूढींवर चढवा हल्ला ! ॥ ३ ॥